# ज्ञानेश्वरी-प्रवेशिका

'ये मऱ्हाठियेचिये नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळ करी'

—ज्ञानेश्वर

लेखक

पं. महादेवशास्त्री जोशी

प्रस्तावना

न्यायरत्न प्रो. धुं. गो. विनोद, एम्. ए.

सन १९४७

सोल एजंट

ज्ञानराज प्रकाशन, पुणें २

मूल्य २ रुपये

# निवेदनाचे चार शब्द



हें पुस्तक लिहिण्याची प्रेरणा मला कां झाली तें प्रथम सांगितलें पाहिजे.

कांहीं वर्षांपूर्वी पुणें येथील समर्थ मंदिरांत मी ज्ञानेश्वरी सांगत होतों. सतत अडीच वर्षें नित्य प्रवचनें करून मी तो ग्रंथ पुरा केला. समाप्तीच्या वेळीं सहज विचार स्फुरला—

"ज्ञानेश्वरी ही आमूलाग्र बोधानें भरलेली आहे. 'प्रतिपर्व रसावह' आहे. या ग्रंथांत बाजूला टाकण्यासारखें किंवा विसरलें तरी चालेल अशा प्रकारचें एकहि अक्षर नाहीं. पण एवढा ग्रंथ मानवी स्मरणाच्या कोशांत कसा सांठवला जायचा आणि तो तसा सांठवणें शक्य नसेल तर त्यांतल्या कोणत्या विषयांकडे जिज्ञासूनें अधिक लक्ष पुरवलें पाहिजे, ते विषय वेगळे काढून एक लहानसें पुस्तक लिहावें."

त्याप्रमाणें मी कामास लागलों आणि अध्यायवारीनें विषय निवडले. प्रत्येक विषय ज्ञानेश्वरांच्याच शब्दांत पण गद्यांत अनुवादिला आणि त्यांतल्या रसाळ, सगुण, सालंकृत ओव्या होत्या त्या मुळांतूनच उद्धृत केल्या. यांत माझ्या पदरचें कांहीं नाहीं. जें आहे तें सगळेंच्या सगळें ज्ञानेश्वरमाउलीचें आहे. ज्ञानेश्वरीरूपी उत्फुल्ल कमळांतला हा सारभूत मकरंद आहे असें म्हणायला हरकत नाहीं.

ज्ञानेश्वरी हा प्रासादिक ग्रंथ आहे हें सर्वांनाच ठाऊक आहे. तिच्यांत काव्य-गुणांतला प्रसाद तर आहेच पण त्याहून विशेष आत्मिक प्रसाद आहे. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, हा प्रसाद अभ्यासकाच्या हृदयांत सहज संक्रांत होणारा आहे. भवतापतप्त जीवानें हा सिद्ध 'प्रसाद' प्राप्त करून घ्यावा आणि दुःखमुक्त व्हावें.

हें पुस्तक वाचल्यानें रसिकांना आणि प्रेमळांना ज्ञानेश्वरीची थोडक्यांत गोडी चाखतां येईल असा माझा विश्वास आहे. याच्या वाचनानें कोण्या भाग्य-

वंताला ज्ञानेश्वरीचा मुळांतून अभ्यास करण्याची जर प्रवृत्ति झाली तर मी स्वतःला धन्य समजेन.

या पुस्तकाला न्यायरत्न प्रो. विनोद या विद्वद्वरेण्यांची प्रस्तावना लाभली हें माझें भाग्य असें मी समजतों. न्यायरत्नांचा तत्त्वज्ञानाचा गाढ व्यासंग विद्वज्जनांस सुपरिचितच आहे. ज्ञानाला आत्मानुभूतीची 'बैसका' लाभली म्हणजे प्रसंगविशेषीं तें कसें सविशेषत्वानें प्रगट होतें तें प्रस्तुत पुस्तकाची प्रस्तावना मनःपूर्वक वाचणाऱ्याला कळून येईल. या त्यांच्या ऋणांतून मी उत्तीर्ण होणें शक्य नाहीं. तशी मला इच्छाहि पण नाहीं. तें भूषण म्हणून मी सदैव शिरीं वाहीन.

हें पुस्तक प्रकाशित केल्याबद्दल 'मङ्गल साहित्य प्रकाशन' च्या चालकांचे मला प्रथम आभार मानले पाहिजेत. त्यानंतर आदरानें नामोल्लेख करायचा तो राजगुरु छापखान्याचे व्यवस्थापक श्री. गानू यांचा. पुस्तकाच्या सजावटीचें सर्व श्रेय तर श्री. दलाल यांनाच दिलें पाहिजे.

सरते शेवटीं ज्ञानेश्वरमाउलीच्या चरणीं लोळण घेऊन हे चार शब्द पुरे करतों.

वाचकांचा नम्र

**महादेवशास्त्री जोशी**

# प्रस्तावना

[ १ ]

पं. महादेवशास्त्री जोशी यांचा ‘ ज्ञानेश्वरी-प्रवेशिका ’ हा ग्रंथ म्हणजे श्रीज्ञानेश्वरीच्या विभूतिमत्त्वाचें एक ओझरतें दर्शन होय.

ज्ञान-ईश्वराच्या आध्यात्मिक ‘ ऐश्वर्याचे ’ महनीय तेजोगोल, लौकिक दृष्टिपथांत आणणारा हा एक विनम्र अंगुलिनिर्देश आहे.

[ २ ]

महाराष्ट्र-संस्कृतीचीं विविध वैशिष्ट्यें हीं श्रीज्ञानेश्वरांच्या मानस-सरोवरांत बहरलेलीं सुवर्णकमलें होत.

महाराष्ट्राच्या आंतर जीवनाची जान्हवी श्रीज्ञानेश्वरीनें रेखाटलेल्या विशाल पात्रांतून वाहत आली आहे.

महाराष्ट्राचें स्वातंत्र्यप्रेम, महाराष्ट्राच्या भक्तियोगाचें ज्ञानवैशिष्ट्य, महाराष्ट्राचा नामनिष्ठ भागवत धर्म, महाराष्ट्राची कणखर तितिक्षा, महाराष्ट्राचें स्वावलंबन, महाराष्ट्रीय आचारांतलें प्रखर बुद्धिप्राधान्य, हे सर्व सांस्कृतिक विशेष, श्रीज्ञानेश्वरांच्या जीवनाचे, जीवनकार्याचे व त्यांच्या प्रतिभाविलासाचेही ठळक विशेष, व्यावर्तक गुणधर्म आहेत.

श्रीज्ञानेश्वरी ही महाराष्ट्रीय संस्कृतीची ऐतिहासिक गंगोत्री व श्रीज्ञानेश्वर हेचि महाराष्ट्राचे परमपूज्य पितृतीर्थ होत.

[ ३ ]

“ ज्ञानान्मोक्षः ” ही घोषणा करणाऱ्या आद्य श्रीशंकराचार्यांचे मार्गदर्शन स्वीकारून, श्रीज्ञानेश्वरांनीं, आध्यात्मिक अनुभवांतदेखील—किंबहुना, आध्यात्मिक अनुभवांत विशेषतः-आवश्यक व उपयुक्त असणाऱ्या बौद्धिक, दार्शनिक दृष्टिकोनाची प्रतिष्ठापना केली.

श्रीज्ञानेश्वरी हा वैदिक अध्यात्मशास्त्राचें विवेचन करणारा एक दर्शनग्रंथ आहे. भावतरल भक्तीच्या सामसंगीताला ऋग्वेदीय ‘ प्रज्ञाना ’चें भास्वर अधिष्ठान, वादक बुद्धिवादाची ज्ञाननिर्विशिष्ट ‘ बैसका ’ श्रीज्ञानेश्वरीनें निर्माण केली.

श्रीज्ञानेश्वरी—हें आत्मविद्येचें एक व्याकरणशास्त्र आहे. " शुध्द कसें विवेकावें व शुध्द कसें व्यवहारावें हें श्रीज्ञानेश्वरी शिकल्यानें समजतें."

श्रीज्ञानेश्वरी म्हणजे ब्रह्मात्मविद्येच्या डोळस अध्ययनाची एक मार्गदर्शिका आहे.

श्रीज्ञानेश्वरींत सु-सूक्ष्म आंतर अनुभूतींची " वृत्तविचिकित्सा " आहे, मानवतेच्या अढळ, अंतिम आकांक्षांचें तौलनिक, तारतम्यप्रधान व्यवस्थापन आहे.

मानभावी पंथांतलें कांहींसें तर्कशैथिल्य, कित्येक आंधळे आचारधर्म, यांचें महाराष्ट्राच्या जीवनावर आभाळ येऊं लागलें होतें. शिवाय इतस्ततः पसरलेली यावनी संस्कृति या अनिष्ट छायामेघांना सहाय्यकच ठरत होती. अशा वेळीं, श्रीज्ञानेश्वरांनीं, वैदिक प्रज्ञानदर्ष्टीची पुनश्च प्राणप्रतिष्ठा केली. मोक्षविद्येचें दर्शन, शासनग्रंथ सादर केला व महाराष्ट्राच्या जीवनाला, अध्यात्माला व संस्कृतीला " ज्ञाना " च्या महनीय ऐश्वर्याचा रत्नालंकार चढविला.

[ ४ ]

ब्रह्मनिष्ठ भारतीय संस्कृतीची 'ब्रह्मपुत्रा' यज्ञ, योग, ज्ञान, भक्ति, व कर्म अशा पंच आपःप्रवाहांनीं परिपुष्ट आहे.

श्रीज्ञानेश्वरींत या पंच 'आपां'चा—पंचप्रवाहांचा–प्रयागराज सिद्ध झाला आहे.

प्रज्ञानाची छटा वैशिष्ट्यानें, ठळकपणें चमकत असली तरी, श्रीज्ञानेश्वरींत तदितर मार्गांचें, विशेषांचें व दृष्टिकोनांचें सम्यक् विवेचन आहे.

श्रीज्ञानेश्वरींत भावार्थाचेंहि दीपन आहे—'भावार्थ दीपिका' हें तर श्रीज्ञानेश्वरीचें नामांतर आहे. पण तेथेंही एक सूक्ष्म श्लेष आहे. नुसता 'भाव' हा दीपनविषय नसून, भावाचा 'अर्थ' उजेडांत आणावयाचा आहे. उपनामदेखील किती सूचक व अर्थगर्भ आहे हें ध्यानांत घेण्यासारखें आहे.

[ ५ ]

श्रीज्ञानेश्वरीचा नित्यपाठ प्रत्येक महाराष्ट्रीय जीवमात्राला वैदिक, औपनिषद, दार्शनिक व गीतानिर्दिष्ट जीवनपरंपरेशीं परिचित ठेवील—त्याची प्रज्ञा, प्रखर व प्रसन्न करील.

सोज्ज्वळ बुद्धिनिष्ठेला, शास्त्रीय दृष्टिकोनाला, डोळस अध्यात्माला श्रीज्ञानेश्वरी हें एक प्रकट आवाहन आहे.

बौद्धिक कूटप्रश्नांच्या सहस्रकांना संगति व समाधान देण्याचें सामर्थ्य श्रीज्ञानेश्वरीच्या नित्यपाठांत आहे.

अंतर्मुख जीवन सुरू झालें कीं मनोवितानांत संशयपिशाच्चांचें सैतानी थैमान सुरू होतें—होणें नैसर्गिक व आवश्यकही आहे.

'ज्ञानशक्ति' धर्मयुध्दाचे नियम आदरून, अज्ञानाशीं झगडत असते.

सुप्त संस्कारांची, निद्रिस्त अज्ञवृत्तींची हत्या ज्ञानाला करवत नाहीं. उठवून, जाग देऊन, समोर उभें करून, ज्ञानशक्ति त्यांना पराजित करूं पहाते.

"केवलं ज्ञानरूपम्" असे श्रीसद्‌गुरुदेव, आपल्या शिष्याचे, शिष्योत्तमाचे संशय व विपर्यय यांना केवळ वरदहस्तानें सहसा शांत करीत नसतात.

राजकारणांत, ज्याप्रमाणें युध्दाशिवाय स्वातंत्र्य नाहीं, त्याप्रमाणें, धर्मकारणांत स्वतःच्या अज्ञानाशीं, अंतर्विरोधांशीं, कश्मल कर्माशयाशीं झुंज घेतल्याशिवाय मोक्ष नाहीं—अंतःशांति नाहीं.

ज्ञानेश्वरीची नित्यसंगति, प्रथमावस्थेंत संशयपिशाच्चांचें रान उठवील, अध्यात्माचें वैयर्थ्य भासवील, महापुरुषांच्या आचरणांत भेसुर विसंगतीचे उठाव दिसतील, गुरुद्रोह निष्पन्न करून 'अहंकार' आपलें क्षुद्र समाधान साधील. पण—पण ज्या अर्धस्फुट ज्ञानशक्तीनें हीं भुतें उठविलेलीं असतात—तीच ती ज्ञानशक्ति स्फुटतर, पक्वतर होऊं लागली कीं हीं भुतें आपोआपच गाडलीं जातात—संशय फिटत जातात, महापुरुषांचें आचरण निष्कलंक व सुसंगत वाटूं लागतें—त्यांची साक्षित्वाची व निःसंगतेची दुर्ज्ञेय भूमिका स्पष्टतर होऊं लागते.

स्वतःच्या मर्यादित, निमुळत्या निकषांनीं विभूतींचें लोकोत्तर चारित्र्य मापण्याची लाज वाटूं लागते, अहं-विशेषत्व लुलें पडतें.

'नरश्रेष्ठ' अर्जुनाला या संशयात्म-अवस्थेंतून जावें लागलें—त्या अवस्थांचें शब्द-चित्रण श्रीज्ञानेश्वरांनीं किती हळुवार पध्दतीनें केलें आहे हें श्रीज्ञानेश्वरीच्या नित्य-पाठकांच्या सहज लक्षांत येईल.

साधकावस्थेंत पहिलें दुसरें पाऊल पडल्याबरोबर आपण 'सिद्ध' आहोंत—साधक नाहीं, असा आभास अहंविशिष्ट जीवांना उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं.

या सर्व अभासांचा, संशयांचा, विपर्ययांचा निरास करण्यास ज्ञात्यांची संगति, महापुरुषसंश्रय, हा एकच एक उपाय आहे.

[ ६ ]

श्रीनाथ संप्रदायांत गुरुशिष्यसंबंधाचें एक उत्क्रांत, विकसित स्वरूप आढळांत येतें.

मानवी संस्कृतीच्या इतिहासांत गुरुशिष्यसंबंधाशिवाय, उज्ज्वलोत्तम घटना संभवल्याच नाहींत.

श्रीआदिनाथ-मत्स्येंद्रनाथांपासून निवृत्तिनाथ-ज्ञाननाथांपर्यंत अविच्छिन्नपणें प्रसृत, व प्रगत झालेल्या श्रीनाथपंथांतील राजगुह्यें, व विद्याबीजें यांचा प्रफुल्ल फुलोरा श्रीज्ञानेश्वरींत प्रकट झाला आहे.

अर्थात् या प्रकटनांत कांहीं संकेत आहेत.

उदाहरणार्थ, ज्ञाननाथांनीं श्रीज्ञानेश्वरीच्या कांहीं अध्यायांच्या प्रारंभीं जी भव्य-सुंदर गुरुपूजा बांधली आहे त्या गुरुपूजेंत नाथपंथांतील श्रीगुरुमार्गाचे, उपासनांचे, व उपासकांचे, नाथपंथांतील गुरुशिष्यसंबंधाचे, रहस्यविशेष प्रकट केले आहेत.

शिष्याची स्वसमर्पणाची कोटि व गुरुदेवांच्या प्रबोधक व विमोचक ज्ञानकृपेची कोटि—हे दोन बिंदु दोन समांतर रेषांवर अगदीं समान अंतरानें सरकत असतात.

श्रीगुरुमार्गांत शिष्यानें स्वतःच्या नामरूपाचें, देहाचें, अंतःकरणाचें व अंतःकरण-चतुष्टयाचें-अहंकार, बुद्धि, मन व चित्त यांचें—सर्वस्व समर्पण करणें आवश्यक असतें.

बुद्धीचें व अहंभावाचें समर्पण करतांना शिष्याच्या जीवभावाला कमालीचे क्लेश होतात. या अवस्थेंत आत्मवंचना अत्यंत प्रभावी ठरत असते.

शिष्याला आपल्या तत्त्वनिष्ठेची व साधनेच्या यथासांगतेची इतकी निःशंकता वाटते कीं, अद्यापिही अंतिम फलश्रुतीचा अभाव असावा हें श्रीगुरूंचेंच दौर्बल्य होय किंवा असूया, लोभ, ममत्व, इत्यादि क्षुद्र भाव श्रीगुरूंना देखील सुटले नाहींत—असे आत्मवंचक दुराग्रह त्या शिष्याला पदच्युत करूं पाहतात. गुरुभावनेचा, गुरुसंपर्काचा संपूर्ण त्याग करावा, अशा मनःस्थितींतहि त्याचें मन आंदोळूं लागतें.

अंशसाधनेनें सतेजलेल्या बुद्धीचें अस्त्र अहंकाराच्या हातांत मिळाल्यामुळें आत्म-वंचक, आत्मरोचक आभास उत्पन्न करणें अहंकाराला सहज शक्य होतें.

आपण कुणी अनन्यसाधारण साधक, असामान्य अभ्यासक आहोंत म्हणजे आपण जागतिक, सार्वत्रिक नियमांना केवळ अपवादभूत आहोंत, आपल्या ठिकाणीं कांहीं अपूर्व, अनुपमेय गुणसंपत्ति आहे-असें बहुधा प्रत्येक साधकाला वाटतें. वस्तुतः सर्व-सामान्यच असणाऱ्या साधकाला तर, स्वतःच्या असामान्यतेबद्दल अविचल निश्चिति असते—स्वतःच्या लोकविलक्षण अधिकाराबद्दल तो सर्वथैव निःशंक असतो.

[ ७ ]

साधकाचा हा भ्रम इतका नैसर्गिक, रोचक व समाधानदायक असतो कीं सिद्ध सद्गुरूंच्या मातृनिर्विशेष प्रेमवृत्तीला त्या भ्रमाच्या बुद्बुदाचें विसर्जन करणें अतीव दुःखद होतें.

ज्वालाग्राही, स्फोटक द्रव्यें खच्चून भरलेला एखादा कंदुक आपल्या लाडक्या लहानग्याचे हातामध्यें असावा; त्या कंदुकाशीं खेळत बसण्याचा अजाण प्राणघातक बालहट्ट त्यानें घेतलेला असावा; जरा तो कंदुक दूर सरकला तर—सरकेल कीं काय या कल्पनेनें सुद्धा—एक द्रावक किंकाळी त्या कमलकोमल कंठांतून निघण्यासाठीं सिद्ध असावी—अशा प्रसंगीं आपल्या पंचप्राणांची सावधानता एकवटून त्या अल्लड अर्भकाची माउली आपल्या चिमुकल्या चांदाचे लाड कांहीं क्षण—कांहीं मोजके क्षणच-पण चालूंहि देते.

अगदीं हेंच चित्र श्रीगुरुमार्गांत आढळून येतें.

गुरुमाउली आपल्या प्रियोत्तम शिष्याला अहंकाराच्या विखारक पकडींत तो असतांनासुद्धां त्याला अणुमात्र न दुखवतां, स्वतः अनंत यातना सोसून त्याचे लाड-कोड पुरवीत पुरवीत पुनः त्याचें संरक्षणच करते.

ही प्रक्रिया इतकी नाजुक, इतकी कलाकुसरीची असते, इतका अंतःसंयम या भूमिकेला आवश्यक असतो कीं, संप्रदायविशिष्ट श्रीगुरूंनाच तो शक्य होतो.

श्रीगुरुमाउलीच्या स्नेहार्द्र कूर्मदृष्टीनें नकळत पुष्ट होतां होतां या व असल्या अनेक महान् दिव्यांतून साधक अखेरचा विजय मिळवूं शकतोच; आणि मग त्याला गुरुशिष्य-संबंधांतलीं आंतर रहस्यें उलगडूं लागतात.

[ ८ ]

श्रीगुरुदेवांना कर्तव्यबुद्धि व कर्तव्यक्षेत्र नसतें. स्वभावसहज आचार हाच त्यांचा परमोच्च नीतिधर्म.

बाह्य जगांतल्या अनेक उत्तेजक प्रसंगांमुळें ज्या प्रेरणा मिळतील त्यांना प्रत्युत्तर म्हणून श्रीगुरुदेवांचे, श्रीअवधूतांचे व जीवन्मुक्त लोकसेवकांचे आचार घटत असतात.

पूर्वकर्मार्जित अहंकेंद्राचा, जीवात्मभावाचा कांहीं अवधूतांचे ठिकाणीं पूर्णतः अभाव असतो.

भारतीय तत्त्वदर्शनांतील अवतारकल्पना व अवतारप्रक्रिया यांना मूलभूत असणारा सिद्धांत हा आहे :—कर्मजनित अहंकेंद्राशिवाय जगद्व्यापार व जगदुद्धार या प्राकृतिक ध्येयासाठीं शुद्ध चैतन्य मानवी जीवनाचे आकारांत अवतरून कार्यक्षम होऊं शकतें.

कर्मबंधाच्या पार्श्वभूमीशिवाय शुद्ध चैतन्याचा प्रकृतिपटावरील आविष्कार म्हणजे अवतार.

कांहीं महानुभावांचे ठिकाणीं, कर्मबंधानें देहप्राप्ति झाल्यानंतरहि शुद्ध चैतन्याची पूर्णानुभूति झाल्यावर अवतारप्रक्रिया सिध्द होऊं शकते.

श्रीराम-कृष्णादि अवतारांचें लौकिक कार्य व सिद्ध सद्गुरूंचे लौकिक व्यवहार तत्त्वतः एकाच आंतर रचनेचे असतात.

कांहीं श्रीसद्गुरूंच्या जीवनाला पूर्वकर्माचा पार्श्व नसतो. कांहींच्या जीवनाला तो असला तरी पूर्णतः अस्तमित झालेला असतो. हें सत्य, हा सिद्धांत कांहींसा वैचित्र्यपूर्ण वाटला तरी अवतारप्रधान आर्यसंस्कृतींत वाढलेल्या व्यक्तीला त्याचें ग्रहण होणें फारसें कठीण नाहीं.

श्रीगुरूंना 'देव' ही संज्ञा कर्मबंधाचें अतीतत्त्व दर्शविण्यासाठींच लावली जाते. देवानें माणसाचा 'अवतार' घेणें व माणसानें देवामध्यें स्वतःचा 'उर्ध्वतार' करणें या दोन्हीहि प्रक्रिया स्वभावतः व फलतः एकच आहेत.

सिद्ध चैतन्याला कर्तव्यप्रधान नीतिमत्तेचीं बंधनें नसतात ; केवळ बहिःप्रेरणांनीं त्याच्या आचरणाचा आविष्कार सिद्ध होत असतो.

श्रीगुरुदेवांना कर्मजन्य अहंकेंद्र जन्मतःच नसतें किंवा असलें तरी लुप्त झालेलें असतें ; त्यामुळें त्यांचे आचरणांत पुष्कळ वेळां लौकिक एकसूत्रतेचा अभाव आढळतो. त्यांचे हेतु व कृति, विचार व आचार यांमध्यें लौकिक दृष्टीला विसंगति भासूं शकते.

निरहंकृत जीवनाचें नीतिशास्त्र सर्वसामान्य, लौकिक व वासनाप्रधान नैतिक ध्येयांचे कक्षेबाहेर असतें.

सिद्ध सद्गुरूंचे आचार व बद्ध साधकांचे आचार यांचें बाह्य स्वरूप सारखेंच असतें. भेद असतो तो, त्या आचारांच्या कारक तत्त्वांत, मूल हेतूंत व अंतःकरणाच्या पार्श्वस्पंदांत.

बहिर्मुख दृष्टीला, लौकिक दृष्टीच्या मीमांसकाला अहंकारानें अंध झालेल्या उन्मत्त शिष्यसाधकाला सिध्द सद्गुरूंचे अलौकिक हेतु, आंतरस्पंद कसे ओळखणार ?

लोकोत्तर चेतोव्यवहार, अलौकिक पुरुषांचे मनोव्यापार, सिध्द सद्गुरूंचे संकेत कोण ओळखूं शकेल ?—असा मार्मिक प्रश्न भवभूतीनें उपस्थित करून त्याचें नकारार्थी उत्तर स्वतःच सूचित केलें नाहीं काय ?

गुरु-शिष्यसंबंधांत श्रीगुरुदेवांच्या आचरणांतील कारक तत्त्वें नजरेआड झाल्यामुळें प्रामाणिक पण अल्पज्ञ शिष्यसाधकापुढें महान् पेंचप्रसंग उपस्थित होतात.

श्रीगुरुदेवांच्या आचरणाचा अन्वयार्थ पुष्कळ वेळां लागत नाहीं. त्यांचे अभिप्राय व हेतु सुस्पष्ट होत नाहींत व त्यामुळें आदरवृत्तींतील एकेक मात्रा कमी होऊं लागते.

अहंकारजड साधकाला वाटतें कीं, "मला दिसत नसलेली, कळत नसलेली गोष्ट असणें शक्यच नाहीं. मला ज्या गोष्टींचें विलोभन आहे, आकर्षण आहे त्या

गोष्टींचें विलोभन व आकर्षण श्रीगुरुदेवांनाहि असलेंच पाहिजे. माझीं वैगुण्यें, माझे दोष, माझे प्रमाद, माझे ठिकाणीं आहेत त्याअर्थीं श्रीगुरुदेवांचे ठिकाणींहि ते असलेच पाहिजेत." असल्या रोचक व वंचक अनुमानांचीं प्रमाणें म्हणून तो शिष्य स्वतःच्या व श्रीगुरुदेवांच्या आचरणांतील केवळ बाह्य अंगें तुलनेसाठीं विचारांत घेतो.

"मी इंद्रियतृप्ति साधीत आहें—श्रीगुरुदेवहि इंद्रियनिष्ठ जीवन जगतांना दिसतातच, मग मी बध्द कां ? व ते मुक्त कसे ?" ही त्याची समस्या !

श्रीगुरुदेवांचे हेतु, कारक तत्त्वें निराळीं असतात, त्यांचें आचरण अहंकेंद्रानें निर्णीत होत नाहीं.—बाह्य उत्तेजकें (Stimuli) त्यांच्या इंद्रियग्रामाला कार्य-प्रवृत्त करीत असतात. विशुध्द चैतन्याच्या प्रकाशानें उद्दीप्त झालेला त्यांचा देह बाह्य प्रकृतीच्या उत्क्रांतीला पोषक अशा केवळ प्रतिक्रिया देत असतो. या प्रति-क्रियांत अहंकार, बुध्दि, मन व चित्त हा अंतःकरणात्मक कर्माशय जागृत नसतो व म्हणून बाह्यतः तेच व तसेच दिसणारे आचार, स्वभावांत अगदीं वेगळे, म्हणजे अनासक्त व निष्काम असतात. या वस्तुस्थितीचें प्रमाण म्हणून एक ठळक लक्षण सांगतां येईल. श्रीगुरुदेवांच्या सर्व वासना, मंद, अ-तीव्र असतात. त्यांच्या वास-नांना 'आग्रह' नसतो. सफल झाल्या किंवा निष्फल झाल्या तरी त्यांना हर्ष-विषाद बाधत नाहींत. स्थितप्रज्ञांच्या प्रज्ञेचें, बुद्धीचें लक्षण भगवान् व्यासांनीं 'अनाग्रह' असें दिलें आहे.

सिद्ध सद्गुरुंना वासनाच नसते असें नव्हे. वासनेचा 'अभाव' ही मुक्ति नव्हे—वासनेंतलें बंधक बीज दग्ध होणें ही मुक्ति होय. त्यांना कांहीं वासना असतात, पण त्या स्वेच्छाप्रारब्धांतल्या नसतात—प्राकृतिक, समष्टिक उत्क्रांतीच्या उत्तेजकांनीं निर्माण केलेल्या असतात.

श्रीगुरुदेव वासनाहीन नसतात व त्यामुळें शिष्याची सहज दिशाभूल होते. त्यांच्या वासना तीव्र असतात, निष्केंद्र असतात, पण त्या 'असतात' व म्हणून शिष्याला स्वतःचा आचार व श्रीगुरुदेवांचा आचार यांतला भेद प्रतीत होत नाहीं. हा भेद प्रतीत होण्यास खरी अडचण बौध्दिक अधिकाराचा अभाव ही नव्हे—अहंकाराचा अतिरेक हीच खरी अडचण श्रीगुरुदेवांच्या स्वस्वरूपाचें आकलन होण्याचे आड येत असते.

कांहीं वासना अ-तीव्र, मंद, रूपांत तरी कां असाव्या याचें कारण कुशाग्र व अनु-भवनिष्ठ बुध्दीला सहज ओळखतां येईल. सर्व वासनांचें निर्मूलन करावयाचें झाल्यास ती एक स्वतंत्र वासना होईल—व ती तीव्रतम झाली तरच सर्व 'इतर' वासनांचें निर्मूलन होऊं शकेल. एकहि वासना तीव्रतम झाली कीं त्यांत 'बंधन' आलेंच. म्हणून स्वभावतः सिध्द असलेल्या कांहीं वासना असूं देणें हाच खरा 'वासनाजय' होय, हा सिध्दांत अनुभवोन्मुख व साधनाव्यग्र शिष्याला आत्मसात्

होईल. अंतर्मुख दृष्टीनें स्वतःच्या अनुभवाचें निरीक्षण करण्याची थोडी संवय असली तर श्रीगुरुमार्गांतले सिध्दांत स्वयंस्पष्टतेनें तळपूं लागतात.

श्रीगुरूंच्या ठायीं असलेल्या एकाद्या ठळक गुणोत्कर्षापुढें अहंकाराला नमविणें खरोखर कितीतरी सोपें कार्य आहे. त्यांच्या ठिकाणचें विश्वप्रेम, त्यांच्या बुध्दिमत्तेचें सर्वंकषत्व, त्यांच्या स्वतःच्या साधनेंतील प्रखरता, त्यांची सेवावृत्ति–त्यांचे व्यक्तिमत्त्वाचा असला कोणताहि एक प्रकाशमय पैलू निवडून, त्यांचे चरणीं एकदांच आपल्या अहंकाराचा पूर्णपणें होम करावा.

स्वतःचे ठिकाणीं असलेल्या त्या गुणापेक्षां श्रेष्ठतर कोटीचा गुण श्रीगुरूंचे ठायीं असला कीं पुरे आहे. व्यास-वाल्मीकींनाही लाजवितील असे प्रतिभासंपन्न सद्‌गुरु आढळेपर्यंत स्वस्थ बसणाऱ्या महाभागाला अध्यात्माची खरी आंच लागलेली नसते—ती लागल्यावर सद्‌गुरु शेजारच्या घरांत असल्याचें आढळतें व तेथें नसले तरी सातां समुद्रांपलीकडून येऊन त्याचे पुढें ते उभे राहतात.

"मी सद्‌गुरूंचा आहें एवढेंच मला समजतें—श्रीगुरु माझे पूर्णतः असणें शक्यच नाहीं—'न मामकीनस्त्वम्' ( श्रीशंकराचार्य )—

—लहान वर्तुळ मोठ्या वर्तुळांत बसूं शकेल; मोठें वर्तुळ लहान वर्तुळांत कसें सामावेल? सिंधूंत बिंदु असेल-बिंदूत सिंधु कसा स्थिरावेल?" अशी भावना शिष्याचे ठिकाणीं पूर्णपणें बिंबली पाहिजे. गुरुभाव अहंकाराचें निर्मूलन करण्यासाठीं आहे व दुसऱ्या कोणत्याहि उपायानें अहंकार नाहींसा होत नाहीं. गुरुतत्त्वाला क्षुद्रत्व देऊन स्वतःच्या अहंकाराची सूज वाढवीत राहणाऱ्या शिष्याला आंतर शांति कशी लाभणार?

अहंकार कुठल्याही एका बिंदूवर नमला तरी त्याची नांगी मोडते, बीज दग्ध होतें.

"माझ्या साधना–सामर्थ्याचे बळावर, माझ्या निर्दोष उपासनेंतील स्वयंसिद्ध शक्तीनेंच मी आत्मशांति, मोक्ष, ईशकृपा मिळवूं शकेन—या पद्धतींत मला गुरुभाव सहज डावलतां येईल व स्वतःला नमविण्याचें महान् अरिष्ट मी टाळूं शकेन."—हा दुर्दम्य अहंकाराचा अत्यंत हिडीस असा अवतार साधकावस्थेंत शिष्याची गांठ घेण्यास व त्याच्या अध्यात्माला मूठमाती देण्यास सदैव खडा असतो.

बिचारा शिष्य! वाट चुकलेलें व वारा प्यालेलें पाडस!

त्याच्या कोट्यवधि नमस्कारांनीं श्रीसद्‌गुरूंचे गुरुपद उंचावलें जात नाहीं व त्यानें एकदांहि नमन न केलें तर तें गिरकी खाऊन खालीं पडत नाहीं!

त्याच्या स्वतःच्या विकासक्रमांत अगदीं अटळ, अपरिहार्य असलेल्या अहंकार-जयासाठीं त्यानें 'गुरुभाव' उभारावयाचा आहे.

जी साधना, जी उपासना अहंकाराला पुष्टवीत राहिली, तिनें दूध पाजून कालसर्प पोसला. तो कालसर्प, त्या साधनेचें, उपासनेचें प्रेत पाडल्याविना राहणार नाहीं हें निःसंशय.

अहंकाराला ईश्वरापुढें वांकविणें अगदीं सोपें आहे. त्याला मानवी सद्गुरूपुढें नमविणें यांतच त्याचें खरें निर्मूलन असतें !

श्रीगुरुमार्गांतला हा सिद्धान्त साधकावस्थेंत सहसा पटत नाहीं. सिद्ध अवस्थेंत मात्र त्या सत्याचा स्थिरप्रत्यय अखंडतेनें जागृत असतो. ईश्वरापेक्षां सद्गुरूचें साहाय्य याच अर्थानें अधिक मोलाचें होय.

अहंकाराचा अस्त करण्यास सद्गुरुवांचून साधन नाहीं. पण हें सत्य आकळण्यासच अहंकाराचा पहिला विरोध असतो, व 'श्रीगुरुमार्गा'चा अवलंब अहंकारामुळें केलाच जात नाहीं !

अनेक प्रकारच्या उत्तेजक व तेजोभजंक अवस्था साधकाला, शिष्याला स्वतःच्या विकासक्रमांत आवश्यक असतात ; व या विविध अवस्थेंतून शिष्याचें संरक्षण व संवर्धन साधण्यासाठीं गुरुत्वाचा उभारा होतो.

श्रीगुरुतत्त्वाला-निरवस्थ, सिध्द चैतन्याला-शिष्याची जरूरी नसते.

नाथप्रणीत गुरुमार्गांत शिष्याला गुरु असतो, पण गुरूला शिष्य नसतो. म्हणजे शिष्य, वेगळा-स्वेतर-नसतो, शिष्याचा पूर्णतः अंतर्भाव श्रीगुरूंत सिद्धच असतो.

शिष्याला स्वतःचा समावेश श्रीगुरूंमध्यें करून घ्यावयाचा असतो—त्याचा अहंकार या समीकरणाचे आड येत असतो. श्रीगुरुमाउली शिष्याला साहाय्य देते; तें सहजस्वभावानें देत असते—विकारानें, अहंगुरुभावनेनें देत नसतें.

जीवचैतन्याची निर्विषय अवस्था म्हणजे ज्ञानवतेची, आत्मरूप ज्ञानशक्तीची, निःसंबंध सहजस्थिति. हीच 'मुक्ता' अवस्था ; हाच 'निवृत्ति' धर्म ; हेंच 'ज्ञान' कैवल्य.

विषयांचा, प्रमेयांचा संबंध सुटला तरी स्वरूपसहज 'ज्ञान' स्वयंसिध्द, स्वयंप्रकाशित राहूं शकतें. यालाच निवृत्तीचें म्हणजे वृत्तिविहिन असें—ज्ञानबिंब म्हणून ओळखावयाचें असतें.

श्रीगुरुदेव ज्ञानदाते असतात. आत्मज्ञानाचें दर्शक सर्वनाम म्हणजे श्रीगुरु. ज्ञानाव्यतिरिक्त संबंध श्रीगुरुतत्त्वाशीं घटवतांच येत नाहींत. जीवनाचे व जीवनांतले इतर सर्व संबंध, शुध्द, ज्ञाननिष्ठ, ज्ञानैकहेतुक असूं शकत नाहींत.

साधनेंत नियुक्त असतांना जीवमात्राला ज्ञाननिष्ठ, ज्ञातहेतुक असा गुरुसंबंध, हा एवढाच संबंध इष्ट व उपकारक असतो.

जीवाच्या ज्ञानवत्तेला गुरुसंबंधानें—ज्ञानसंबंधानें—विषयनिष्ठा येत नाहीं.

अल्पज्ञानाचा पूर्ण ज्ञानाशीं संबंध—साधकाचा श्रीगुरुशीं संबंध, हा प्रमेयाशीं, बहिर्विषयाशीं संबंध नसतो—व म्हणून या संबंधांत जडता नसते, कर्मबंध नसतो, व मोक्षहानि नसते.

कर्मनियतीनें सिद्धवलेले मातृ-पितृ-बंधुसंबंध देखील या गुरु-शिष्य संबंधाइतके सोज्ज्वल नाहींत ; कारण ज्ञानासाठीं व ज्ञानानेंच घटलेले, असे ते संबंध नसतात.

गुरुशिष्यसंबंधांत वासना असलीच तर ज्ञानविषयक असते. इतर संबंधांत, ज्ञान कितीही असलें तरी त्याचें फलित वासनापूर्ति असते.

हा भेद किती महत्त्वाचा आहे ?

केवळ एक गुरुसंबंध मानणाऱ्या साधकाला जीवन्मुक्ति सहजसिद्ध असते; कारण, प्रबंधक संबंधांचा त्यानें त्याग केलेला असतो.

गुरुसंबंधाचा कारक ज्ञानसंबंध हा निःसंबंध अवस्थेला स्थिर ठेवतो.

जीवचैतन्याला विषयसंबंध बहिर्मुख करतात, ज्ञाननिष्ट गुरुसंबंध अंतर्मुख करतो व ठेवतो म्हणूनच, श्रीज्ञानेश्वरांनीं, स्वतःचे हृदयाला चौफाळून गुरुमाउलीचीं पाउलें तेथें ठेवलीं आहेत.

हीं सर्व श्रीगुरुमार्गाचीं रहस्यरत्नें ' ज्ञाननाथां 'नीं श्रीज्ञानेश्वरींत प्रकटविलीं आहेत किंवा लपविलीं आहेत. अहंकाराचा अखेर अस्त साधल्याशिवाय ईश्वरी शक्तीचा अधिवास, गुरुकृपेचें पसायदान उपलब्ध होत नाहीं. श्रीज्ञाननाथ पूर्णपणें अस्तंगत होऊन जेव्हां केवळ श्रीगुरु निवृत्तिनाथ उरतात तेव्हांच श्रीज्ञानेश्वरी प्रसवणारी प्रभातरल प्रतिभा उदित होऊं शकते.

श्रीज्ञाननाथ म्हणतात—अन्न ज्याप्रमाणें मिठाचें वेगळेपण न ठेवतां त्याचा स्वरूपांत अंतर्भाव करतें, त्याप्रमाणें तुमच्यापुढें मी नमून तुमच्यांत—श्रीनिवृत्तींत परिपूर्ण झालों—समरस झालों.

आतां आणीन व्यक्ति। गीतार्थ तो।

आतां मला गीतार्थ सांगण्याचें सामर्थ्य आलें.

[ ९ ]

श्रीज्ञानेश्वरी ही ज्ञानाची ईश्वरी आहे, विश्वज्ञानाचा व ज्ञानविश्वाचा तो एक प्रचंड ' ज्ञानकोश ' आहे. आंतर अनुभवाच्या कोणत्याहि ' पदाचा ' अर्थ त्यांत विशद केलेला आढळेल.

हा ज्ञानकोश पाहतां येण्यास ' प्रत्यक्ष ' गुरुसाहाय्याची अर्थात् अपेक्षा आहे—अतीव अपेक्षा आहे. पण, तिचे अभावीं श्रीज्ञानेश्वरांचा ईश शब्द पौर्वदैहिक बुध्दिसंयोग असेल, परमार्थाची विनम्र वृत्ति असेल, तर शेवटपर्यंत स्वयमेव प्रकाशक व साहाय्यक ठरेल.

'यदृच्छया' गुरुसंपर्क लाधण्याचा योगच आला नाहीं, नसेल, तर श्रीज्ञानेश्वर अवश्य सहाय्यहस्त देतील.

पण, "मला साजेसे गुरु म्हणजे एक श्रीज्ञानेश्वरच"—असल्या उद्दाम व अज्ञ अहंकाराच्या हांकेला उत्तर देण्यासाठीं श्रीज्ञानेश्वर, वाट पाहून राहिले आहेत असा मात्र याचा अर्थ नव्हे !

[१०]

भोगप्रवण, इंद्रियनिष्ठ, बहिर्मुख जगण्याला जो जीव उबगला असेल, विटला असेल ;

परम, अंतिम 'अर्थांच्या' ध्रुव ताऱ्यांची लुकलुक ज्या जीवाच्या चित्तचक्षूला खुणावूं लागली असेल ;

उच्चोत्तुंग केदार शैलाकडे, मानवी जीवनांतल्या 'शिव' सर्वस्वाकडे, 'ज्ञान, स्पर्शानें लाधणाऱ्या अमृतानुभवाकडे जाणारी व नेणारी पाऊलवाट ज्या जीवाला सामोरली असेल ;

त्याच्यासाठीं, केवळ त्या भाग्यवानासाठीं, या आत्मविद्येचा अवतार व आविष्कार आहे.

दूर, सुदूर झंकारलेल्या, निनादलेल्या, स्वरबीजांचे तरलते तरंग ऐकून सभोंवतालच्या निकटवर्ती जगाचा एखाद्या जीवास अचानक वीट यावा, त्याच त्या स्वैर व संदिग्ध उद्गीथाकडे त्या एकाकी जीवानें आपले पाख पालवीत राहावें, तदितरत्र विस्तारलेल्या विश्वसर्वस्वाचा त्याला पुरेपूर विसर पडावा, अशी कांहींशी 'अवस्था' आत्मविद्येच्या या नागिणीचा बुद्धिदेहाला अमृतडंख झाल्यावर एखाद्या एकाग्रलेल्या महाभाग साधकाला अनुभवण्यास मिळते.

स्वार्थोन्मुख सुखासक्तांच्या सायंकाळच्या करमणुकीसाठीं, वैभवांध विलासभक्तांच्या विनोदनासाठीं, अहंकारजड अल्पज्ञांच्या काव्यशास्त्रचर्चेसाठीं, श्रीज्ञानेश्वरी खचित अवतरलेली नाहीं.

आत्मविद्या, गुरुमार्ग, मंत्रसाधना, श्रीज्ञानेश्वरीचा अनुभवाभ्यास, हीं महान् मूल्यें आहेत, हे गहनगंभीर अर्थ आहेत.

परम कोटीची एकाग्रता, सर्वस्वनिवेदनाची तयारी असल्याशिवाय त्या गहनगंभीर अर्थांची, महान् मूल्यांची फलसिद्धि कशी शक्य असेल ?

[११]

श्रीज्ञानेश्वरीच्या अध्ययनानें, नित्यपाठानें, जीवनांतले उदात्त अर्थ उमगूं लागतात. त्या परम अर्थांबद्दल जिव्हाळा वाटूं लागतो.

महाराष्ट्रीय जनतेला या उदात्त अर्थाची ओढणी अधिकाधिक लागावी, श्रीज्ञानेश्वरीचे नित्यपाठ अधिकाधिक सुरू व्हावेत या हेतूनें पं. महादेवशास्त्री जोशी यांनीं हा ग्रंथ प्रसिध्दिला आहे.

ते स्वतः श्रीज्ञानेश्वरीचे निष्ठावान् अभ्यासक व डोळस उपासक आहेत. त्यांनीं लहानमोठीं अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांची भाषापद्धति ललितगंभीर व सहज-सालंकृत आहे. विद्याव्यासंगाची व अंतर्मुख जीवनाची त्यांना स्वाभाविक आवड आहे.

या 'प्रवेशिकेंत' त्यांनीं ज्ञानेश्वरीमध्यें विवेचिलेल्या अधिकरणांची, विषयांची निवड व गुंफण मोठ्या मार्मिकतेनें व चोखंदळ बुद्धीनें केली आहे.

अभ्यासकांच्या अधिकारभेदाप्रमाणें त्यांना ही प्रवेशिका उपयुक्त व प्रकाशक वाटेल. अनेकविध विवरणांतून सुसंगत वळणारे असेच विषय खुडणें हें अभिजात मालाकाराचें कौशल्य या गुंफणींत ठळकपणें प्रत्ययास येतें.

विषयांची सजावट करतांना त्यांनीं विविध वाचकांच्या गरजा व अडचणी पूर्ण-पणें लक्षांत घेतलेल्या दिसतात.

एकंदर ग्रंथाच्या विवेचनाची समग्रता-स्वयंपूर्णता अविच्छिन्न ठेवून शिवाय प्रत्येक अधिकृत विषय स्वतंत्र व स्वयंपूर्ण राखण्यांत लेखकाची विशेष कलादृष्टि दिसून येते.

सानथोर वाचकांना या ग्रंथाच्या अवलोकनानें उद्बोध व आनंद लाभेल.

महाराष्ट्रीय जनतेंत ज्ञानेश्वरीचा नित्यपाठ प्रसृत व्हावा, महाराष्ट्राचें जीवन 'ज्ञान'-निष्ठ व्हावें—हें उद्दिष्ट ठेवून त्यांनीं श्रीज्ञानेश्वरीच्या अंतरंगाचा हा आकर्षक व प्रबोधक परिचय करून दिला आहे.

श्रीज्ञानेश्वरीच्या नित्यपाठकांची संख्या वृद्धिंगत होण्यांतच पं. जोशी यांचें खरें श्रमसाफल्य आहे.

या त्यांच्या पवित्र आंतर वृत्तीचें व प्रसन्न वाङ्मय-कृतीचें सादर आतिथ्य करून, त्याचप्रमाणें या एकंदर उपक्रमाचे प्रोत्साहक माझे 'ज्ञान' प्रेमी स्नेही, मद्रासचे श्री. बाबुराव फडके व पुण्याचे श्री. ना. ग. रानडे, यांचें सप्रेम अभिनंदन करून, ही प्रस्तावना संपवितों.

ॐ तत्सत्

कार्तिक वद्य १३
शके १८६९
ता. १०-१२-१९४७
८६४ सदाशिव पेठ,
पुणें

धुं. गो. विनोद

# समर्पण

ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी यांचे भक्त,

माझे एक निकटचे आप्त

आणि हितचिंतक

**श्री. नारायण गणेश रानडे, कॉन्ट्रॅक्टर,**

आणि

त्यांच्या पत्नी

**सौ. रमाबाई रानडे**

यांस



— लेखक

# ज्ञानेश्वरी-प्रवेशिका



## १ ज्ञानेश्वरीची बैठक

एखाद्या कुलांत कोणी नामवंत पुरुष चमकून गेला कीं त्या कुलाची सर्वत्र प्रसिद्धि होते आणि एखाद्या गावीं अलौकिक अशी एखादी घटना घडल्यास तें गांव इतिहासांत अमरपद पावतें. नगर जिल्ह्यांतील नेवासें हें अशांपैकीं आहे.

एवढेंसें चिमुकलें गांव; पण तें आज भागवतधर्मीयांच्या मनींमुखीं वास्तव्य करून राहिलें आहे. एका महात्म्याकडून महाराष्ट्रभाषेच्या कलापूर्ण मंदिरावर दीप्तिमान असा सोनेरी कळस त्या ठिकाणीं चढवला गेला हेंच त्याचें एकमेव कारण. आणि याच एका गोष्टीमुळें नेवाशाला आज तीर्थरूपता प्राप्त झाली आहे.

पैठणास शुद्धिपत्र आणण्याकरितां गेलेलीं हीं भावंडें तिथें कांहीं काल राहिलीं. ज्ञानेश्वरांनीं रेड्याच्या मुखानें वेद वदवून पैठणच्या लोकांना आपलें ईश्वरी तेज दाखविलें. पैठणकर ज्ञानेश्वरांचे भक्त बनले. थोडे दिवस त्यांना आपल्या संगतीचा लाभ देऊन हीं भावंडें स्वच्छंदानें फिरत, श्रीहरीचे गुणानुवाद गात, आणि आपल्या दर्शन-संभाषणानें जनांच्या हृदयांत सात्त्विक वृत्तीचा उदय करीत नेवाशाला आलीं.

गांवाला लागूनच वहाणारी प्रवरा नदी, समुद्रमंथनप्रसंगीं देवकाजासाठीं मोहिनीरूपानें अवतरलेला आणि पुढें याच ठिकाणीं वास्तव्य करून राहिलेला मोहिनीराज महाविष्णु, तो रम्य परिसर आणि तीं पंचक्रोशींतलीं अनादि क्षेत्रें.

त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र
जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥

अशा त्या पवित्र स्थानीं या भावंडांचें मन रंगलें. 'हें विश्वचि माझें घर' अशी त्यांची वृत्ति होती. त्यामुळें हें गांव आपलें आणि हें परकी असा आपपरभाव त्यांच्या मनांत नव्हताच. जिथें राहतील तेंच त्यांचें गांव आणि तेंच घर !

ज्ञानेश्वरमंडळ नेवाशाला येऊन राहिल्याची वार्ता सुगंधासारखी आजूबाजूला पसरली. हजारों लोक त्यांच्या दर्शनाला येऊं लागले. हरिप्रेमानें रंगलेले आणि या भवार्णवांतून बाहेर पडूं इच्छिणारे मुमुक्षुजन त्यांच्याजवळ येऊन बसूं लागले. जिज्ञासूंनीं प्रश्न विचारावे आणि ज्ञानेश्वरांनीं त्यांचें समाधान करावें अशी उदंड आत्मचर्चा तिथें सुरू झाली. अशाच वेळीं एके दिवशीं निवृत्तिनाथांच्या अंतरांत एक कल्पना प्रादुर्भूत झाली आणि ते ज्ञानेश्वरांना म्हणाले—

"ज्ञानदेवा, तूं भगवद्गीतेवर मराठी भाषेंत ग्रंथरचना कर. भवतापतप्त जीवांना गीतेसारखा उपशामक आणि आत्मलाभ करून देणारा दुसरा ग्रंथ नाहीं. गीतेवर अनेक टीका आणि भाष्यें झालीं आहेत. पण तीं सगळीं संस्कृत भाषेंत असल्यामुळें प्राकृतजनांना गीता दुर्लभ झाली आहे. तेव्हां तूं असें भाष्य लिही कीं, त्यांत भगवंताचा आशय यथार्थत्वानें प्रगट व्हावा आणि सर्वांना उद्धाराचा मार्ग सुलभ व्हावा."

ज्ञानेश्वर म्हणाले—"गुरुमाउली, किती जबाबदारीचें आणि अवघड काम आहे हें ! माझ्या हातून कसें हें तडीला जाणार ? मी ना शास्त्री, ना पंडित, ना कवि ! आपली आज्ञा अमान्य तरी कशी करूं आणि 'हो' तरी कसें म्हणूं ?"

"तूं प्रारंभ तर कर. भगवत्कृपेनें सगळें कांहीं सिद्धीला जाईल. तुला त्याची काळजी नको. कर्ता करविता तो आहे. ही प्रेरणाहि त्याचीच आहे असें तूं समज." निवृत्तिनाथ बोलले.

'ठीक आहे' म्हणून ज्ञानदेवांनीं निवृत्तिनाथांच्या चरणीं मस्तक नम्र केलें. एक शुभ दिवस ठरला. हें वर्तमान थोड्याच वेळांत ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें. सगळे लोक त्या दिवसाची उत्कंठेनें वाट पाहूं लागले. तो सोन्याचा दिवस उगवला. सर्व लोक शुचिर्भूत होऊन ज्ञानेश्वरमंडळाच्या निवासस्थानीं जमा झाले. रांगोळया काढून ज्ञानेश्वरांना बसायला आसन मांडण्यांत आलें. समोर चौरंग ठेवून त्यावर गीतेची पोथी ठेवण्यांत आली. दोन बाजूंना दोन समया पाजळल्या. ज्ञानेश्वर सद्गुरूला आणि श्रोतृसमूहाला नम्रपणें अभिवादन करून आसनस्थ झाले. निवृत्तिनाथ ज्ञानेश्वरांच्या जवळ बसले. सगळे लोक आपापल्या जागीं निःस्तब्ध झाले.

ज्ञानेश्वरांनीं कांहीं क्षण अंजलिसंपुट जोडून आराध्य देवतेचें ध्यान केलें आणि लगेच त्यांच्या मुखांतून पहिली ओवी बाहेर पडली—

ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या ।
जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥

ज्ञानेश्वर हे अद्वयानंदवैभवाच्या सिंहासनावर सामरस्याचा मूर्धाभिषेक झालेले सम्राट् होते. अर्थात्, गीतेंत सिद्धांतरूपानें प्रतिपाद्य जो परमात्मा, त्यालाच त्यांनीं या पहिल्यावहिल्या ओवींत नमन केलें हें स्वाभाविकच होय. परमात्म्यानंतर शिष्टसंप्रदायाला अनुसरून त्यांनीं गणपतीला स्तवनपूर्वक प्रणाम केला आहे. ज्ञानेश्वरांचा हा गणपति निराळाच पण अलौकिक आहे. तो वाङ्मयगणपति आहे. वेद आणि वेदांगें, दर्शनें आणि शास्त्रें, इतिहास आणि पुराणें, काव्यें आणि नाटकें, मीमांसा आणि उपनिषदें यांना एकेका अवयवाच्या जागीं कल्पून निर्माण केलेला हा दिव्य गणराज आहे.

त्यानंतर विश्वमोहिनी शारदेला त्यांनीं वंदन केलें आणि मग सद्गुरु-स्तवनाच्या रसाळ ओव्या त्यांच्या वाणींतून स्रवूं लागल्या—

मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।
म्हणवूनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥

जैसें डोळ्यां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे ।
मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधि ॥

कां चिंतामणि आलिया हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं ।
तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो म्हणे ॥

म्हणोनि जाणतेन गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे ।
जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥

—अ० १ ओ० २२ ते २५

संध्यासमयीं नभोमंडळांत एकामागून एक तारका प्रगट होऊं लागाव्या तशा ज्ञानेश्वरांच्या दैवी वाणींतून ओव्या लागोपाठ झरूं लागल्या. ती महाराष्ट्र-रसवंती श्रवणद्वारें हृदयांत प्रविष्ट झाल्यामुळें श्रोतृसमाज मंत्रमुग्ध नागासारखा डोलूं लागला. हा गीतेचा नवा अवतार प्रगट होण्याच्या वेळीं तिथलें सगळें वातावरण मंगलमय झालें. कधीं न अनुभवलेली सुखनिर्भरता जनांना प्रतीत होऊं लागली.

मूळचेच सुंदर, सुकुमार ज्ञानेश्वर त्या प्रभावळींत अधिकच सुंदर दिसत होते. त्यांची दृष्टि अर्धोन्मीलित आणि अंतर्मुख झाली होती. ते जणुं गीतेच्या अर्थाशीं क्षणाक्षणानें अधिकाधिक तद्रूप होत होते. इतस्ततः विखुरलेल्या बोध-चंद्राच्या कळा एकत्र होऊन त्यांच्या हृदयींच्या चित्कळेशीं एकजीव होत होत्या. आणि तो एकवटलेला ज्ञानप्रकाश नेत्रांच्या गवाक्षांतून बाहेर पडून ज्ञानेश्वरांच्या मुद्रेवर विलसत होता.

त्यांच्या मुखांतून उगम पावलेला हा सरस्वतीचा प्रवाह पुढें अकुंठित गतीनें खळाळूं लागला. एक ओवी संपली, आतां दुसरी कोणती प्रगट होणार तें ऐकण्याविषयीं श्रोत्यांच्या कानामनाला छंद लागला. सच्चिदानंद-बाबा लेखक म्हणून जवळच बसले होते. पडलेलेंच फळ वेचावें तसे ते झालेलीच ओवी सावधपणें टिपून घेऊं लागले.

गुरुवंदन झाल्यावर 'आतां अवधारा कथा गहन' म्हणून ज्ञानेश्वरांनीं गीतेचा प्रस्ताव मांडला. "मायबाप संत सज्जनहो, महाभारतासारखा दुजा ग्रंथ या त्रिभुवनांत आढळणार नाही. तो नवरसांचा महासागर आहे. तें सर्व विद्यांचें आणि कलांचें मूळपीठ आहे. आमूलाग्र बोधानें भरलेला पण कोंवळा. भगवद्गीता ही या महाभारतांतच आहे. भारताचीं पर्वें अठरा. जणुं अठरा पाकळयांचें कमळच. आणि गीता हा त्यांतला सारभूत मकरंद. ही गीता सर्वांनांच आवडते. भक्त हिचें श्रवण करतां करतां डोलतात. ब्रह्मनिष्ठ पुरुष सोहंभावानें हिच्या ठिकाणीं रमतात."

## २ संतांना विनवणी

"तुम्हांलाहि या गीतामृतरसाचा आस्वाद घ्यायचा आहे ना ? मग माझी एक विनंति ऐका. तुमच्या चित्तांतली रूक्षता पार काढून टाका. चित्त कसें फुलाच्या पाकळीसारखें कोमल होऊं द्या. त्यावांचून नाहीं ही सुधाधारा चाखतां येणार."

जैसे शारदीयेचे[1] चंद्रकळे[2] । माजी अमृतकण कोवळे ।
ते वेंचिती मनें मवाळें । चकोरतलगें[3] ॥
तियांपरी श्रोतां । अनुभवावी हे कथा ।
अति हळुवारपण चित्ता । आणुनियां ॥
जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें नेणती ।
तैसी परी[4] आहे सेविती । ग्रंथीं इये ॥

—अ० १ ओ० ५६ ते ५९

"संतसज्जनहो ! माझ्यासारख्या मतिमंदानें गीतार्थ कवळूं पहाणें हें अक्षम्य धाष्टर्य आहे; पण तरीहि तें करायला मी प्रवर्तलों आहे. कारण, सद्गुरु माझा पाठीराखा आहे. हा माझा उपक्रम तोच तडीला नेईल.

१. शरदृतूंतल्या. २. चांदण्यांत. ३. पिलें. ४. पद्धति.

परी येथ असे एकु आधारु । तेणोंचि बोलें मी सधरु ।
जैं सानुकूल श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥
लोहाचें कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे ।
कीं मृतही जीवित लाहे । अमृतसिद्धि[१] ॥
जयातें कामधेनु माये । तया अप्राप्य कांहीं आहे ? ।
म्हणऊनि मी प्रवर्तों लाहें । ग्रंथीं इये ॥
तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।
करूनि घेयावें हें तुमतें । विनवितु असें ॥

—अ० १ ओ० ७५ ते ८०

तरी सज्जनांना माझी हीच प्रार्थना कीं, त्यांनीं यांत जें न्यून होईल तें आपल्या कृपादृष्टीनें भरून काढावें आणि अधिक असेल त्याचा त्याग करावा !"

ज्ञानेश्वरांचें हें नम्र बोलणें ऐकून निवृत्तिनाथ त्यांना म्हणाले, "ज्ञानदेवा ! या विनंतीची आवश्यकता नाहीं. तूं आतां गीतार्थ-निरूपणाला लवकर प्रारंभ कर. सगळे श्रोते बघ कसे उत्कंठित झाले आहेत."

निवृत्तिनाथांच्या या भाषणानें अंतरीं उल्हासून ज्ञानदेवांनीं श्रोत्यांच्या प्रार्थनेचा तो विषय तितकाच सोडला आणि 'आज्ञा प्रमाण' म्हणून गीतेच्या प्रारंभाचा पहिला श्लोक म्हटला — 'धृतराष्ट्र उवाच : धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे—'

## ३ अर्जुनविषाद

कौरव-पांडवांमधली तेढ वाढत गेली आणि अखेर युद्धप्रसंग ओढवला. उभयपक्षांचें मिळून अठरा अक्षौहिणी सैन्य कुरुक्षेत्राच्या विस्तीर्ण मैदानावर एकवटलें. सेनापति नेमले गेले. विविध व्यूहरचना झाली. निरनिराळे सैन्य-

१. अमृत प्राप्त झाल्यावर.

विभाग अतिरथी, महारथी यांच्या हवालीं करण्यांत आले. दुर्योधनानें भीष्माचार्यांना मोठेपणा देऊन 'तुमच्यावरच आमची सारी भिस्त आहे' असें सांगितलें.

त्या भाषणानें उत्तेजित होऊन भीष्मांनीं प्रचंड सिंहनाद केला. त्या नादानें आकाश दणाणलें. सागर प्रक्षुब्ध झाले. गिरिकंदरें दुमदुमलीं. त्याच्या पाठोपाठ रणतुरें झडूं लागलीं. वीर आवेशानें भुजा त्राहाटायला लागले. हत्तींच्या अंगांतही मद संचरला.

पांडवांच्या सैन्यांत मध्यभागीं अर्जुनाचा रथ होता. गरुडासारखे वेगवान् असे चार घोडे त्या रथाला जोडलेले होते. ध्वजस्तंभावर मारुति होता. आणि भगवान् गोपालकृष्ण सारथ्य करण्यासाठीं रथाच्या धुरेवर बसला होता.

> देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्ताचें ।
> जें सारथ्यपण पार्थाचें । करितु असे ॥
>
> पाइकु[1] पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला ।
> तेणें पांचजन्य आस्फुरिला[2] । अवलीळांचि[3] ॥
>
> –अ० १ ओ० १४२ व १४३

कृष्णार्जुनांसह सर्व पांडवांनीं आपापले शंख वाजवले. दोन्ही सैन्यें उठावलीं. शस्त्रांचा खणखणाट सुरू झाला. तेव्हां अर्जुनानेंहि आपलें धनुष्य लीलेनें उचललें आणि श्रीहरीला म्हटलें, 'देवा, माझा रथ मागें आहे तो उभयसैन्यांच्या मध्यभागीं घेऊन चल. माझ्याशीं युध्द करायला आलेल्या वीरांचें मला एकवार निरीक्षण करूं दे.'

कृष्णानें 'ठीक आहे' म्हटलें व रथ पुढें काढला. अर्जुनानें शत्रुसैन्यावर दृष्टि टाकली मात्र, तों तो आश्चर्यानें स्तंभितच झाला. तो देवाला म्हणाला, "भगवन् ! हा काय प्रकार आहे ? हे शत्रु कसले ? हे तर माझे आप्त ! पितामह भीष्म, गुरु द्रोणाचार्य आणि इतर स्वजन-बंधु हे माझ्याशीं लढायलाच आले

१. सेवक. २. फुंकला. ३. एकदम.

आहेत का ? मी यांच्याशींच युद्ध करायचें का ? एकाच कुळांतल्या लोकांनीं एकमेकांचा जीव घेणें याला युद्ध म्हणतां येईल का ? हा देखावा पाहून माझ्या अंगाला तर कंप सुटला आहे. तोंडाला कोरड पडली असून धनुष्य हातांतून गळूं पहात आहे."

" प्रभो ! या कौरवांना जर मारायचें तर धर्म-भीमांना कां मारूं नये ? यांना संहारून का मी राज्य मिळवूं ? यांच्या मृत्यूनें का भोग संपादूं ? जळो तें राज्य ! मी मुळींच यांच्यावर बाण टाकणार नाहीं. त्यांनीं वाटल्यास मला मारावें. गोत्रवधाचें पाप किती भयंकर आहे हें कौरव जाणत नसले तरी मी जाणतों. जगांतले सारे दोष गोत्रवधाच्या ठिकाणीं एकवटले आहेत. माझ्या हातून जर हें निंद्य कर्म घडलें तर देवा, मला तूं जवळ करशील का रे ? जिथें पाप आहे तिथें परमेश्वर रहात नाहीं. आणि पांडवांच्या जीवनांतून कृष्ण निघून गेला तर पांडवांचें काय उरलें मग !"

" कुलक्षयांत अनर्थपरंपरा सांठवलेली आहे. त्यायोगें कुलधर्म बुडतो. मग कुलस्त्रिया बिघडतात. त्या दूषित झाल्या कीं वर्णसंकर ठेवलेलाच. तो झाला कीं पितरांचा अधःपात आणि शेवटीं नरक ! राज्याची अपेक्षा धरायची ती कुलासाठीं. पण तेंच जर लयाला गेलें तर राज्याचा उपभोग घ्यायचा कोणी ? आणि राज्य तरी कुठें शाश्वत आहे ? राज्यें येतात आणि जातात. पण त्यांच्यासाठीं केलेलीं पापें मात्र कर्त्याच्या माथीं बसतात."

बोलतां बोलतां अर्जुनाला गहिवर आला आणि 'छेः ! मी मुळींच लढणार नाहीं' असें म्हणून त्यानें रथाखालीं उडी घेतली.

## ४ अर्जुनाची शरणागति

अर्जुन शोकाकुल होऊन रडत होता. कारुण्यानें त्याचें चित्त द्रवलें होतें. मीठ पाण्यांत विरघळावें, अभ्रें वाऱ्यानें उडवून लावावीं, तसें त्याचें धीरोदात्त हृदय डळमळलें होतें. राजहंस चिखलांत रुतून बसावा तसा तो म्लान दिसत होता. श्रीहरीला त्याची ही दुर्दशा पहावेना. तो म्हणाला—

" अर्जुना ! आज तूं हें आरंभलें आहेस तरी काय ? एवढा मोठा वीराग्रणी तूं आणि या प्रसंगीं असा रडत काय बसला आहेस ? आजवर तूं अनुचित

कधीं आचरलें नाहींस. धीर कधीं सोडला नाहींस. देवदैत्यांनाहि धाक उत्पन्न करणारें तुझें पौरुष. पण कारुण्यवृत्तीनें आज तुला कसें दीन करून सोडलें आहे! अंधःकारानें सूर्याला कधीं ग्रासलें आहे का? बेडकानें कधीं भुजंग गिळला आहे का? लांकडानें कधीं अग्नीला खाल्लें आहे का? मग तुलाच आज दैन्य कसें बाधलें? पार्था, दया हा सद्‌गुण खरा; पण युद्धाच्या वेळीं नव्हे. संग्रामाच्या प्रसंगीं हृदयाचें ढिलेंपण हें क्षत्रियाच्या अधःपाताला कारण होतें."

त्यावर अर्जुन म्हणतो, "देवा, तूं म्हणतोस तें खरें आहे. पण हें युद्ध नव्हे; हा प्रमाद आहे. ज्यानें मला धनुर्विद्या शिकवून एवढ्या योग्यतेला चढवलें त्या द्रोणाचार्यांवर शरसंधान करायला मी का भस्मासुर आहें? भीष्माचार्य तर माझे आजोबा. वयोवृद्ध आणि ज्ञानवृद्ध. त्यांचे पाय धरायचे तें सोडून त्यांच्या हृदयावर शस्त्रप्रहार कसा करूं? असलें अघोर कर्म करण्यापेक्षां गिरि-कंदरांत जाऊन रहावें. असल्या राज्यपदापेक्षां भीक मागणें बरें!"

"देवा! मी म्हणतों हें चूक आहे का? तूं बोलत कां नाहीस? असा स्तब्ध का बसला आहेस? मी बोलतों तें मला योग्य वाटतें. पण तें उचित का अनुचित हें तुलाच एकट्याला ठाऊक. तूंच सांग मी काय करूं तें? माझा तुझ्यावर विश्वास. तूंच माझें सर्वस्व!"

तूं गुरु बंधु पिता। तूं आमुची इष्टदेवता।
तूंचि सदा रक्षिता। आपदीं आमुतें॥

जैसा शिष्यांतें गुरु। सर्वथा नेणे अव्हेरूं।
कीं सरितांतें सागरु। त्यजी केवीं?॥

तरी उचित काय आम्हा। जें व्यभिचरेना[1] धर्मा।
तें झडकरी पुरुषोत्तमा। सांगें आतां॥

—अ० २ ओ० ५९ ते ६३

---

१. विरुद्ध नाहीं असें.

ज्ञानेश्वर म्हणतात कीं, मोहरूपी काळसर्पानें अर्जुनाला दंश केला. तें विष त्याच्या शरिरांत भिनलें. भ्रांतीच्या लहरींवर लहरी येऊं लागल्या. काय होणार अर्जुनाचें आतां ? तो जगणार का मरणार? पण आपल्याला नको त्याची काळजी ! श्रीहरि गारुडी धांवून आला आहे. केवळ कृपादृष्टीनेंच तो अर्जुनाचें विष उतरील. अर्जुनरूपी पर्वत मोहाचा वणवा लागून करपला आहे. आतां तो मेघश्याम कृपाजलाची वृष्टि करील. पर्वताचा दाह शमेल आणि तिथें नवे ज्ञानांकुर उगवतील. असो.

गोपालकृष्ण म्हणाला—

अर्जुना, तुला शहाणा म्हणावें का अज्ञानी म्हणावें तेंच मला समजेनासें झालें आहे. शहाणा म्हणवतोस, पण अंतरीं अज्ञान भरलें आहे. बरें, शिकवायला जावें तर तूंच मला नीतीच्या गोष्टी सांगत आहेस. कौरव मरतील म्हणून तुला शोक झाला आहे. काय ही तुझी भ्रमिष्ट समजूत ! विश्वाचे जन्म-मृत्यु तूं उत्पन्न केले आहेस का ? तूं यांना मारलें नाहींस तर हे काय अमर होतील ? मी मारणारा आणि हे सगळे मरणारे ही कल्पना तूं आधीं सोडून दे. सृष्टि अनादिसिद्ध आहे. ती स्वभावतःच उत्पन्न होते आणि नाश पावते. ज्ञानाच्या दृष्टीनें पहायचें तर उपजणें आणि मरणें ही केवळ भ्रांति आहे.

हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे ।
येरव्हीं तत्त्वतां वस्तु जें असे । तें अविनाशाचि ॥

जैसें पवनें[1] तोय हालविलें । आणि तरंगाकार जाहलें ।
तरी कवण कें[2] जन्मलें । म्हणोंये तेथ ॥

तेंचि वायूचें स्फुरण ठेलें[3] । आणि उदक सहज सपाट जाहलें ।
तरी आतां काय निमालें[4] । विचारीं पां ॥

—अ० २ ओ० १०५ ते ७

१. वाऱ्यानें. २. कुठें. ३. थांबलें. ४. नष्ट झालें.

## ५ देह नश्वर आणि आत्मा अमर

देह होतात आणि जातात; पण आत्मा अमर असतो. तो कधीं जन्मत नाहीं, कधीं मरत नाहीं. भरलेला कलश उपडा होतो आणि त्यांत प्रतिबिंबित झालेला सूर्य अदृश्य होतो. पण वर पहावें तों आकाशांत आहेच. तसेंच शरीर निमालें म्हणजे त्यांतलें आत्मतत्त्व नष्ट झाल्यासारखें वाटतें खरें; पण तें कधींहि नाश पावत नाहीं. जीर्ण वस्त्र टाकून देऊन आपण नाहीं का दुसरें नवें नेशीत? तसाच चैतन्यनाथहि जुन्या देहाचा त्याग करून नव्याचा स्वीकार करतो. हा निर्गुण, निर्विकार आणि भूतमात्रीं भरलेला आहे. या आत्म्याचें स्वरूप तुला कळलें कीं तुझा शोक आपोआप दूर होईल.

आत्म्याच्या दृष्टीनें पाहिलेंस तर तो अविनाशी असल्यामुळें तुझा शोक व्यर्थ ठरतो आणि देहाच्या दृष्टीनें पाहिलेंस तर देह हा जाणाराच असल्या-कारणानें त्याबद्दल शोक करण्यांत अर्थ नाहीं. आत्म्याला कोणी मारूं शकत नाहीं व देहाला कोणी राखूं शकत नाहीं. अर्थात् 'मी लढणार नाही' हा तुझा निश्चय वेडेपणाचा आहे.

## ६ स्वधर्म कधींहि सोडूं नये

शिवाय या प्रश्नाला आणखीहि एक बाजू आहे. स्वधर्म हा कोणालाहि आणि कोणत्याहि परिस्थितींत टाकतां येत नाहीं. आणि धर्माचरणानें कोणालाहि पातकाचा स्पर्श होत नाहीं.

वायांचि व्याकुळ कायी। आपुला निजधर्म तूं पाहीं।
जो आचारितां बाधु नाही। कवणे काळीं॥
जैसें मार्गेंचि चालतां। अपावो नपवे सर्वथा।
कां दीपाधारें वर्ततां। नाडळिचे॥
तयापरी पार्था। स्वधर्में रहाटतां॥
सकळकामपूर्णता। सहजें होय॥

—अ० २ ओ० १८६ ते ८८

अर्जुना, संग्राम हा क्षत्रियांचा स्वधर्म आहे. त्यांत मरणें किंवा मारणें टळत नाहीं. युद्धांतली हत्या हा वध नव्हे. हा स्वधर्म तूं टाकशील तर मात्र पापाचा धनी होशील. सगळे महादोष तुला शोधीत येतील. जगांत अपकीर्ति होईल ती वेगळीच. जोंवर अपकीर्ति अंगाला शिवली नाहीं तोंवरच जगण्यांत भूषण आहे. तूं युद्धांतून पाय मागें घेतलास कीं हे कौरव तुझा उपहास करतील. त्यांचे मर्मभेदक वाक्प्रहार सोसण्यापेक्षां युद्ध केलेलें काय वाईट? धारातीर्थी पडलास तर स्वर्गांतलीं अप्रतिम सुखें भोगशील. विजयी झालास तर पृथ्वीचें निष्कंटक राज्य मिळेल.

## ७ निष्काम कर्मयोग

दुसरी एक गोष्ट तुला सांगतों. कर्म हें बंधक आहे खरें; पण तेंच जर फलाची आशा सोडून केलें तर बाधत नाहीं. भागा आलेलें कर्म माणसानें नेहमीं आचरीत रहावें. मात्र, त्या कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या फलाची अभिलाषा धरूं नये. यालाच बुद्धियोग म्हणतात. बुद्धियोग हें वज्रकवच आहे. तें अंगांत चढवून कर्माच्या रणांत घुसणाऱ्या कर्मवीराला पापरूपी शस्त्रांचे वार लागत नाहींत. अर्जुना, कर्म करणें हाच तुझा अधिकार आहे. फलाची विवंचना तूं करूं नको. निषिद्ध कर्में सोड आणि निष्कामपणें सत्कर्मांचें आचरण कर.

तूं योगयुक्त होऊनी। फळाचा संग टाकुनी।
मग अर्जुना चित्त देउनी। करी कर्में॥

परी आदरिलें कर्म दैवें। जरी समाप्तीतें पावे।
तरी विशेषें तेथ तोपावें। हेंहि नको॥

कीं निमित्तें कोणे एकें। तें सिद्धी न वचत ठाके[1]।
तरी तेथिंचेनि अपरितोखें[2]। क्षोभावें ना॥

१. थांबलें. २. असंतोषानें.

आचारितां सिद्धी गेलें । तरी काजाचि कीर[1] आलें ।
परि ठेलियाहि सगुण[2] जालें । ऐसेंचि मानी ॥
देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरुषीं अर्पिजे ।
तरी परिपूर्ण सहजें । जाहलें जाणें ॥

—अ० २ ओ० २६७ ते ७१

चित्ताचें समत्व हेंच योगाचें सार आहे. योगामध्यें मन-बुद्धीचें ऐक्य झालेलें असतें. तूं या बुद्धियोगाच्या ठायीं स्थिर हो. जे योगयुक्त असतात तेच पैलपार जातात. त्यांना पापपुण्य बाधत नाहीं. ते स्थितप्रज्ञ समजले जातात.

त्यावर अर्जुनानें स्थितप्रज्ञाचीं लक्षणें कोणतीं असें देवाला विचारलें. देव त्याला सांगूं लागले.

## ८ स्थितप्रज्ञाची ओळखण

ऐक अर्जुना. ज्याच्या अंतरांतला काम जळून गेला आहे आणि जो निजानंदांत रममाण झाला आहे त्याला स्थितप्रज्ञ म्हणावें. संकटें आलीं म्हणून तो वैतागत नाहीं. सुखें भेटलीं म्हणून तो हुरळत नाहीं. त्याच्या ठिकाणीं काम-क्रोध नसतात म्हणून तो कोणाला भीत नाहीं. भूतमात्रीं त्याचें अंतःकरण सदय असतें. कांसवाप्रमाणें त्याचीं इंद्रियें त्याच्या स्वाधीन झालेलीं असतात. तो सांगेल तें आणि तेवढेंच तीं करतात. विषयांचें स्मरण-सुद्धां तो करीत नाहीं.

विषयांचा त्याग केवळ बाह्यतःच होऊन चालत नाहीं. अंतरांत त्याची चव उरली असेल तर ते पुनश्च उठावणी करतात. म्हणून मनोभूमींतून त्यांचीं पाळेंमुळें खणून काढलीं पाहिजेत. मग त्यांजविषयींचा अनुरागहि जाईल. द्वेषहि तोंड काळें करील. आणखी एक वर्म ऐकून ठेव. जग हें नाना विषयांनीं भरलेलें आहे व आपणाला त्यांतच वावरायचें आहे. जोंवर देह

१. खरोखर. २. चांगलें.

आहे तोंवर विषय टाळावे म्हटलें तरी तें शक्य होत नाहीं. खरोखर विषय-सागरांत आपण पडलेले आहों. यांत बुडूं नये असें वाटत असेल तर विषयां-संबंधीं प्रीति किंवा अप्रीति कांहींच धरूं नये. म्हणजे इंद्रियें विषयात रमलीं तरी प्रत्यवाय नाहीं. सूर्याचे किरण पवित्र स्थळीं आणि अपवित्र जागींहि शिरतात. पण सूर्याला त्यांपैकीं कशाचाहि लेप लागत नाहीं. त्याप्रमाणें जो विषयांविषयीं उदासीन आणि आत्मरसानें भरलेला आहे त्याला विषयविष मारक होत नाहीं. अशा पुरुषाला स्थितप्रज्ञ म्हणतात. त्याच्या तनुमनांवर अखंड प्रसन्नता झळकत असते. आणि जिथें प्रसन्नता खेळत असेल, तिथें दुःखें डोकावणारहि नाहींत.

देखें अखंडित प्रसन्नता । आथी[1] जेथ चित्ता ।
तेथें रिगणें नाही समस्तां । संसारदुःखां ॥
जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु[2]
तया क्षुधा तृषेचा अडदरु[3] ! कहींचि नाही ॥
तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैंचें कें आहे ? ।
तेथ आपैसी[4] बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥

—अ० २ ओं० २३८ ते ४०

पार्था, आणखी एका प्रकारें हा स्थितप्रज्ञ पुरुष ओळखतां येतो. तो अथांग सागरासारखा असतो. वर्षाकाळीं साऱ्या नद्या दुथडी भरून खळाळत, फेसाळत त्याला जाऊन मिळतात ; पण तो आपली मर्यादारेषा उल्लंघीत नाहीं. ग्रीष्मकाळीं त्या आटून जातात ; पण सागर आटत नाहीं. तसेंच या स्थित-प्रज्ञाचें आहे. ऋद्धि-सिद्धी प्राप्त झाल्या म्हणून तो चढून जात नाहीं आणि त्या मिळाल्या नाहींत किंवा येऊन गेल्या म्हणून तो कावराबावरा होत नाहीं. कोणत्याहि परिस्थितींत तो अचळ आणि अढळ असतो.

---

१. आहे. २. पोट. ३. बाधा. ४. आपोआप.

सांगें सूर्याच्या घरीं । प्रकाश काय वातीवेरीं ।
कां न लविजे तरी अंधारीं । कोंडेल तो ? ॥
देखें ऋद्धि सिद्धि तयापरी । आली गेली से नकरी ।
तो विगुंतेला[1] असे अंतरीं । महासुखीं ॥
जो आपुलेनि नागरपणें[2] । इंद्रभुवनातें पाबळें[3] म्हणे ।
तो केवीं रंजे पालिवेंणें[4] । भिल्लांचेनी ? ॥
जो अमृतासी ठी[5] ठेवी । तो जैसा कांजी न सेवी ।
तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥
पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुख लेखेनीय[6] नाही ।
तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता होती ॥

—अ० २ ओ० ३६१ ते ६५

वीरश्रेष्ठ अर्जुना! ही निस्सीम ब्राह्मी स्थिति ज्यानें अनुभवाच्या कक्षेंत आणली त्याला अनायासें आत्मस्वरूपाचा लाभ होतो.

## ९ अर्जुनाच्या मनाचा गोंधळ

त्यावर अर्जुन आशंका घेऊन म्हणतो—

श्रीकृष्णा! तूं एवढा वेळ जें बोललास त्यावरून, आत्मस्वरूपीं कर्ता आणि कर्म हीं दोन्ही शिल्लक उरत नाहींत असा तुझा अभिप्राय मला दिसला. मग देवा, मला या घोर कर्मांत कां ढकलूं पहातोस? आधीं कर्मांचा निषेध करतोस आणि मग लगेच 'तूं कर्म कर' असा मला उपदेश करतोस यांत मी खरें काय समजावें? तूंच असें धरसोडीचें बोलणें बोलायला लागलास तर संपलेंच म्हणायचें! वैद्यानें कडक पथ्य सांगून जावें आणि औषध

१. निमग्न. २. रसिकपणें. ३. तुच्छ. ४. झोपडी. ५. नांवें ठेवणें. ६. महत्त्वाचें.

पाठवायचें तें विषमिश्रित पाठवावें म्हणजे रोग्याची आशाच नको. तुझ्या या उपदेशानें माझें स्थिर असलेलें चित्त कालवलें मात्र. प्रभो, मी मतिमंद आहें. मला जें कांहीं सांगायचें तें उघड्या भाषेंत सांग. निर्भीडपणें बोललों म्हणून माझ्यावर रोष करूं नको.

तुज ऐसा निजगुरु । आजि आर्तिंवणी[1] कां न करूं ? ।
एथ भीड कवणाची धरूं । तूं माय आमुची ! ॥
देखा अमृतसिंधूतें ठाकावें[2] । मग तहानाचि जरी फुटावें ।
तरी सायासु कां करावे । मागील ते ॥
देखें सत्कीर्तिचें जियालें[3] । आजि पुण्य यशासि आलें ।
हे मनोरथ जाह्ले । विजयी माझे ॥

—अ० ३ ओ० २१ ते २७

## १० कर्मत्याग म्हणजे नैष्कर्म्य नव्हे

अर्जुनाची ही आशंका ऐकून देव क्षणभर विस्मित झाला. "पार्था, अरे तूं व्यर्थ गोंधळलास. ईश्वरार्पण बुद्धीनें केल्या जाणाऱ्या कर्माचें गौरव सांगत असतां सहज मी ज्ञानमार्गाविषयीं चार शब्द बोलून गेलों. खरें म्हणजे जगांत कर्मयोग आणि ज्ञानयोग या दोन निष्ठा आहेतच आणि त्या मींच प्रगट केल्या आहेत. मात्र अधिकारभेदानें हे मार्ग आचरायचे आहेत. विचारवंत लोक ज्ञानयोगाचें आचरण करतात आणि कर्माधिकारी कर्म-योगाच्या मार्गानें जातात. दोन्ही मार्ग मोक्षाकडेच जाणारे आहेत. पहिला मार्ग हा विहंगममार्ग असून दुसरा पिपीलिकामार्ग आहे. पहिल्यांत मोक्षरूपी फळ त्वरित मिळतें आणि दुसऱ्या मार्गांत मोक्ष मिळायला थोडा अवसर लागतो.

कर्मांचा आरंभच केला नाहीं म्हणजे ज्ञाननिष्ठा प्राप्त होते असें मात्र समजूं नको. वर्णाश्रमाला उचित असें कर्म न करणें म्हणजे नैष्कर्म्य नव्हे.

---

१. इच्छापूर्ति. २. पुढें उभें रहावें. ३. जीवन.

कीं प्राप्त कर्म सांडिजे । येतुलेनि[1] नैष्कर्म्य[2] होइजे ।
हें अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥
जंव निरातता[3] नाही । तंव व्यापारु[4] असे पाहीं ।
मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे[5] सहजें ॥
म्हणोनि आइकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था ।
तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥

—अ० ३ ओ० ४६ ते ५०

शिवाय, कर्म करणें वा टाकणें हें आपल्या हातांत आहे कुठें? आपले सर्व व्यापार प्रकृतीच्या आधीन आहेत. विहित कर्माचा त्याग केला म्हणून सगळीं कर्में थांबतील का? कान शब्द ऐकणार नाहींत का डोळे रूप पाहणार नाहींत? श्वासोच्छ्वास आणि तहानभूक तरी कुठें थांबते? जागृति आणि निद्रा या तरी कुठें सोडतात? फार काय, जगणें आणि मरणें हीं तरी कर्मेंच नव्हेत का? मग टाकलें तें काय? प्रत्येक जीव हा प्रकृतीच्या रथांत बसलेला आहे. त्याला वाटतें, आपण एका जागीं स्थिर आहों. पण तो सारखा भ्रमत असतो. म्हणून जोंवर प्रकृतीचा बंध आहे तोंवर निष्कर्मता असंभवनीय आहे. आणि ही जर गोष्ट खरी तर मग उचित कर्म सोडून निषिद्धाचें आचरण करण्यांत काय स्वारस्य?

## ११ स्वधर्म हाच यज्ञ

आपल्या अधिकाराप्रमाणें जो स्वधर्म आचरतो त्याला त्या आचरणानेंच निश्चित मोक्ष मिळतो. धर्माचरण हा एक नित्ययज्ञ आहे. आणि यज्ञासाठीं केलेल्या कर्मांत पापाचा शिरकाव होत नाहीं. विधात्यानें सृष्टि करतांना धर्मरूप यज्ञ प्रत्येक जीवाला जोडून दिला आहे. या यज्ञांतच त्याचें जीवन

१. एवढ्यानें. २. निष्कर्म. ३. निरिच्छपणा. ४. कर्म. ५. थांबते.

आणि पोषणहि आहे. स्वधर्मयज्ञानें देव संतुष्ट होऊन मानवांचा योगक्षेम चालवतात. हा देवा-मानवांचा प्रेमसंबंध जोडणारा मधला दुवा आहे. ब्रह्मदेव जीवांना उपदेश करतात—

म्हणवूनि स्वधर्म जो सांडील । तयातें काळु दंडील ।
चोरु म्हणोनि हरील । सर्वस्व तयाचें ॥

मग सकळ दोषु भंवते । गिंवसोनि घेती तयातें ।
रात्रिसमयीं स्मशानातें । भूतें जैशीं ॥

तैशीं त्रिभुवनींचीं दुःखें । आणि नानाविधें पातकें ।
दैन्यजात तितुकें । तेथेंचि वसे ॥

ऐसें होय तया उन्मत्ता । मग न सुटे बापा रुदतां ।
कल्पांतींही सर्वथा । प्राणिगण हो ! ॥

—अ० ३ ओ० ११२ ते १५

स्वधर्म नाहीं तर जीवनांत काय राम आहे ? तो केवळ भूमीला भार होय. जणूं शेळीच्या गळयांतला स्तन किंवा अकालीं आलेलें अभ्रपटल. देहाच्या पाठोपाठ कर्तव्य येतें हें माणसानें जाणलें पाहिजे. अर्जुना, देहधारण करून जे उचित कर्मांचा कंटाळा करतात ते गांवढे आहेत असें तूं समज. जनकासारख्या जीवन्मुक्तांनींहि स्वकर्म सोडलें नाहीं.

देख पां जनकादिक । कर्मजात अशेखें ।
न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ॥

याकारणें पार्था । होआवी कर्मीं आस्था ।
हे आणिकाही एका अर्था । उपकारेल ॥

१. वेढून. २. संपूर्ण.

जे आचरतां आपणपयां[1] । देखी[2] लागेल लोका यया ।
तरी चुकेल अपाया । प्रसंगेंचि ॥
देखें प्राप्तार्थ[3] जाहले । जे निष्कामता पावले ।
तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥
मार्गीं अंधासरिसा । पुढें देखणाही[4] चाले जैसा ।
अज्ञाना प्रगटावा धर्मु तैसा । आचरोनी ॥
हां गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे ।
तिहीं कवणेपरी जाणिजे । मार्गातें या ? ॥

—अ० ३ ओ० १५२ ते ५७

अज्ञ मनुष्य फलाच्या आशेनें जसें तत्परतेनें कर्म करील, तितकाच भर देऊन कृतार्थ पुरुषानेंहि कर्म आचरावें. कारण परमात्म्यानें निर्माण केलेली ही लोकसंस्था सर्वांनीं रक्षण केली पाहिजे. ज्या ईश्वराचे आपण भक्त आहों त्याचेंच हें कार्य आहे. म्हणून ज्ञानी पुरुषानें मार्गाधारें वर्तून विश्वाला धर्माच्या मोहोरेस लावावें.

कित्येक वेळां माणसाला स्वतःचें विहित कर्म आवडेनासें होतें. आपलें तें वाईट आणि दुसऱ्याचें तें बरें असा त्याला भ्रम पडतो. तो दुसऱ्याच्या कर्मांकडे आशाळभूत दृष्टीनें पाहूं लागतो. सर्वांनाच थोड्याफार प्रमाणांत आपापल्या कर्मांबद्दल अनादर असतो. रोजच्या संवयीनें स्वकर्मांतलें नावीन्य लोपलेलें असतें आणि दुसऱ्याच्या कर्मांशीं परिचय नसल्यानें तें दुरून आकर्षक वाटतें. म्हणून—

अगा स्वधर्मु हा आपुला । जरी कां कठिणु जाहला ।
तरी हाचि अनुष्ठिला । भला देखें ॥

१. स्वतःला. २. चालरीत. ३. मुक्त. ४. डोळस.

येरु आचारु जो परावा[1] । तो देखतां कीरे[2] बरवा ।
परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि ॥
तरी लोकांचीं धवळारें[3] ! देखोनियां मनोहरें
असतीं आपुलीं तणारें[4] । मोडावीं केवीं ॥
तेविं आवडे तैसा सांकडु[5] । आचरितां जरी दुवाडु[6] ।
तरी स्वधर्मुचि सुरवाडु[7] । परत्रींचा ॥
म्हणोनि आणिकांसि जें विहित । आणि आपणपेयां अनुचित ।
तें नाचरावें जरी हित । विचारिजे ॥
या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेंचु[8] होईल जीविता ।
तोहि निको[9] वर उभयतां । दिसत असे ॥

—अ० ३ ओ० २१९ ते २९

श्रीहरींचें हें भाषण अर्जुनाला पटलें असावें. कारण त्यानें त्याला विरोध दर्शविला नाहीं. मात्र त्याच्या मनांत निराळाच एक मूलभूत प्रश्न उपस्थित झाला. 'आपला धर्म टाकावा आणि दुसऱ्याचा स्वीकारावा अशी माणसाला इच्छा तरी कां व्हावी ? ही स्वभावतःच उत्पन्न होते का हिचा कोणी प्रेरक आहे ? शहाणीं, विचारी माणसेंसुद्धां या मोहाला का बळी पडतात ? त्यांच्यावर हा बलात्कार कोण करतो ?'

अर्जुनाच्या या प्रश्नाला भगवंतांनीं एकदम उत्तर दिलें; 'काम आणि क्रोध ! हे अंतरांत वाढले, हृदयांत पघळले कीं तेच पुरुषाला अशा अनुचित कर्मांत प्रवृत्त करतात.

१. दुसऱ्याचा. २. खरोखर. ३. बंगले. ४. झोंपड्या. ५. संकटमय. ६. कठीण. ७. सुखावह. ८. हानि. ९. चांगला.

## १२ काम-क्रोधांचा बलात्कार

तरी हे काम क्रोधु पाहीं। जयांतें कृपेची सांठवण नाही।
हे कृतांताच्या ठायीं। मानिजती ॥

हे ज्ञाननिधीचे भुजंग। विषयदरीचे वाघ।
भजनमार्गींचे मांग। मारक जे ॥

हे मृत्यूच्या नगरीं। मानिजती निकियापरी।
जे जीविताचे वैरी। म्हणऊनियां ॥

साध्वी शांती नागविली। मग माया मांगी शृंगारिली।
तियेकरवीं विटाळविलीं। साधुवृंदें ॥

इहीं विवेकाची त्रायें फोडिली। वैराग्याची साल काढिली।
जितया मान मोडिली। उपशमाची ॥

इहीं संतोषवन खांडिलें। धैर्यदुर्ग पाडिले।
आनंदरोप सांडिलें। उपडूनियां ॥

—अ० ३ ओ० २४० ते ५३

हे पाण्यावांचून बुडवतात. आगीवांचून जाळतात. दोरावांचून बांधतात. पैज मारून हे ज्ञानी पुरुषांना आकळून घेतात. चंदनाच्या वृक्षाला जसा सर्पांचा तसा ज्ञानाला यांचा विळखा बसलेला असतो. हे अंतरांतून फिटले, निभ्रांत नाहींसे झाले, तरच ज्ञानाचा निभाव लागेल. परब्रह्मींचें स्वराज्य हवें असेल तर या दोघांना आधीं निर्दाळून टाकलें पाहिजे. यांना लोळवावें आणि मग आत्मानंदांत यथेच्छ डुंबावें!'

१. चांगले म्हणून. २. बैठक. ३. शांतीची. ४. तोडिलें. ५. धैर्यरूप किल्ले.

## १३ देवाच्या पुराणत्वाबद्दल आक्षेप

ज्ञानेश्वर म्हणतात—"देवाचें अर्जुनावर अपार प्रेम आहे. त्याला उपमाच देतां येणार नाहीं. अमूर्त परमात्मा जणुं पार्थासाठींच व्यक्त दशेला आला आहे. योग्यांनाहि न सांपडणारा, वेदालाहि आकलन न होणारा हा श्रीहरि, अर्जुनाच्या प्रेमाला भुलून त्याला पुढें काय सांगतो तें ऐका.

"तुला मीं जो हा योग सांगितला तोच पूर्वीं मी सूर्याला सांगितला होता. सूर्यानें तो मनूला कथन केला आणि मनूनें इक्ष्वाकूला निवेदिला. अशी याची परंपरा फार जुनी आहे. पण पुढें लोक विषयांच्या नादीं लागून देहात्मवादी बनल्यामुळें त्यांची या योगाविषयींची आस्था कमी झाली आणि शेवटीं ही परंपरा लोपली. पण आज तूं माझा सखा, प्रेमाचा पुतळा आणि भक्तीचा जिव्हाळा मला भेटलास म्हणून तुझें अज्ञान घालविण्यासाठीं मीं त्याचा पुनरुद्धार केला."

यावर अर्जुन म्हणतो--

"करुणाघना ! आईनें आपल्या लेंकरावर माया केली तर त्यांत नवल कसलें ? तूं संसारतप्तांची साउली आणि अनाथ जीवांची माउली आहेस. एखाद्या मातेला पांगळें मूल झालें तर तिला जन्मभर त्याचा जोजार सोसावा लागत नाहीं का ? मीहि तसेंच तुझें पांगळें पोर आहें. माझा सगळा भार तुझ्यावर. असो. पण आतां तूं जें बोललास त्यावर मला एक शंका आली आहे ती विचारतों. तूं म्हणतोस कीं, मी हा योग प्रथम सूर्याला सांगितला. पण सूर्य कधीं जन्मला तें आमच्या वाडवडिलांनासुद्धां ठाऊक नाहीं. आणि तूं तर सांप्रतचा म्हणजे चालू पिढींतला. मग तूं सूर्याला योग कसा आणि केव्हां सांगितलास ? तुझें हें बोलणें मला खरें वाटत नाहीं. पण मी तें खोटें तरी कसें म्हणूं ? कारण तुझें चरित्र अगम्य आहे. तेव्हां माझ्या मनींची ही आशंका फेडशील का ?"

देव म्हणाले—"अर्जुना ! ज्या वेळीं सूर्य जन्मला त्या वेळीं मीहि होतोंच; तसाच तूंहि होतास. तुझे-माझे आजवर अनेक जन्म झाले आहेत. माझे

पूर्वीचे सारे जन्म मला आठवतात आणि तुझे तुला आठवत नाहींत एवढाच काय तो फरक.

## १४ ईश्वराचे अवतार

मी जन्म घेतों पण माझें अव्ययत्व नष्ट होत नाही. माझी स्वतंत्रता मोडत नाहीं. मी कर्माधीन आहें असें लोकांना भासतें, पण तीहि भ्रांति आहे. प्रत्येक युगामध्यें अवतार घेऊन मी धर्मसंस्थापना करावी, असा क्रम सृष्टीच्या प्रारंभापासून चालत आलेला आहे. ज्या ज्या वेळीं अधर्म माजतो आणि तो धर्माची पायमल्ली करतो, त्या त्या वेळा देहाकारानें प्रकट होऊन मी काय करतों तें ऐक--

ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होउनि अवतरें ।
मग अज्ञानाचें आंधारें । गिळूनि घालीं ॥
अधर्माची अवधी तोडीं । दोषांचीं लिहिलीं[1] फाडीं[2] ।
सज्जनांकरवीं गुढी । सुखाची उभवीं ॥
दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिवसीं[3] ।
धर्मासी नीतीशीं । शेंस भरीं ॥
मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं ।
तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥
स्वसुखें विश्व कोंदे । धर्मचि जगीं नांदे ।
भक्तां निघती दोंदें । सात्त्विकाचीं ॥

—अ. ४ ओ. ५१ ते ५५

चारी वर्ण मीच निर्माण केले. प्रकृतिगुणानुसार त्यांचीं कर्मेंहि मींच विवंचिलीं. हें सारें करूनहि मी अकर्ता आहें. माझें हें करून अकर्तेपण ज्यानें जाणलें तो ज्ञानी असें समज. आत्मा कांहींच करीत नाही आणि कशाचाहि

१. भक्तांच्या. २. खतपत्रें. ३. पुन्हा मिळवून देणें.

उपभोग घेत नाहीं. हें सारें करणें, हे सगळे खेळ प्रकृतीचे आहेत असें अनुभवाला येणें म्हणजेच ज्ञान.

## १५ ज्ञान–माहात्म्य

हें ज्ञान झालें कीं प्रवृत्ति पांगुळते. तर्काचे डोळे जातात. इंद्रियें विषयसंग विसरतात. मन मनपणाला मुकतें. शब्द निःशब्द होतो. आणि ज्ञेय परमात्मा आपोआप हातीं येतो. अर्जुना, हें आत्मज्ञान आपल्याला मिळावें अशी जर तुझी इच्छा असेल तर तुला उपाय सांगतों.

तें ज्ञान पैं बरवें । जरी मनीं आथी आणावें ।
तरी संतां या भजावें । सर्वस्वेशीं ॥
जे ज्ञानाचा कुरुठा[1] । तेथ सेवा हा दारवंटा[2] ।
तो स्वाधीन करी सुभटा ! । वोळगोनी[3] ॥
तरी तनुमनजीवें । चरणाशीं लागावें ।
आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥
मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगतील पुशिलें ।
जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा नये ॥
जयाचेनि वाक्यउजिवडें । जाहलें चित्त निधडें[4] ।
ब्रह्माचेनि पाडें । निशंकु होय ॥
ते वेळीं आपणपेयांसहितें । इयें अशेषेंही भूतें ।
माझ्या स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥
ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेलें[5] । तैं मोहांधकार जाईल ।
जैं श्रीगुरुकृपा होईल । पार्था गा ॥

—अ० ४ ओ० १६४ ते ७०

१. भांडार. २. उंबरठा. ३. आश्रय करून. ४. निर्भय. ५. उजाडेल.

संत हे तत्त्वदर्शी असतात. आत्मतत्त्व त्यांनीं अनुभवलेलें असतें. त्यांना शरण जाऊन ज्ञान संपादणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. कारण ज्ञानावांचून मोक्ष नाहीं. तसेंच ज्ञानासारखी जगांत दुसरी पवित्र वस्तु नाहीं. पृथ्वी एवढी विस्तीर्ण, पण तिला ज्ञानाची सर येणार नाहीं. आकाशाला अनंत म्हणतात, पण ज्ञान त्याहून अनंत, अपार आहे. अमृताची चव जशी अमृतालाच तशी ज्ञानाची पवित्रता ज्ञानालाच !

मात्र श्रद्धा असली पाहिजे. श्रद्धावंतालाच ज्ञानलाभ होतो. आणि ज्ञानी असेल त्यालाच शांति माळ घालते. ज्या प्राण्याला ज्ञानाची आवड नाहीं त्याचें जीवन हें मरणाहूनहि अधिक यातनामय आहे.

ऐकें जया प्राणियाच्या ठायीं । इया ज्ञानाची आवडी नाही ।
तयाचें जियालें म्हणों कायी ! । वरी मरण चांग[1] ॥
शून्य जैसें कां गृह । कां चैतन्येंवीण देह ।
तैसें जीवित तें संमोह । ज्ञानहीन ॥
वांचूनि ज्ञानाची गोठी कायसी । परी ते आस्थाहि न धरी मानसीं
तरी तो संशयरूप हुताशीं[2] । पडिला जाण ॥
जे अमृतही परी नावडे । ऐसें सावियांचि[3] अरोचकु[4] जैं पडे ।
तैं मरण आलें असे फुडें । जाणों एकीं ॥
तैसा विषयसुखें रंजे । जो ज्ञानेंसीचि माजे ।
तो संशयें अंगिकारिजे । एथ भ्रांति नाही ॥
मग संशयीं जरी पडिला । तरी निभ्रांत जाणें नासला ।
ऐहिक परत्रा मुकला । सुखासि गा ! ॥

—अ० ४ ओ० १९२ ते ९८

१. बरें. २. अग्नींत. ३. स्वाभाविक. ४. अरुचि, अवढणें.

म्हणून अर्जुना! तूं या संशयाला हृदयांत थारा देऊं नको. ज्ञानाचें तीक्ष्ण खड्ग हातांत घे आणि संशयाचे शतखंड करून टाक."

## १६ संन्यास आणि योग—दोन्ही एकच

अर्जुनानें म्हटलें, "देवा, असें कसें तुझें बोलणें? एकदां सांगतोस कीं, सर्व कर्मांचा संन्यास करावा आणि दुसऱ्यांदा म्हणतोस कीं, कर्मयोगच बरा. आतां आम्हीं काय बरें समजावें? मला असा संशयांत पाडूं नको. या दोहोंतला चांगला मार्ग कोणता, अचूक फल कोणत्या मार्गांत मिळेल आणि त्यांतल्या त्यांत आचरायला सोपा कोणता तें मला विशद करून सांग."

तेव्हां गोपाळकृष्ण किंचित् स्मित करून बोलूं लागला: "बाबारे, कर्मयोग काय किंवा संन्यास काय दोन्ही मार्ग मोक्षाकडेच जाणारे आहेत. पण जाणत्या-नेणत्या सर्व लोकांना कर्मयोग हा प्रांजळ आहे. नौका जशी आबाल-वृद्धांना नदीच्या पैलपार नेते तसा हा मार्ग तारक आहे. याचें चांगल्या प्रकारें आचरण झालें तर संन्यासाचें फळहि यांतच लाभतें. वस्तुतः हे दोन्ही मार्ग एकच आहेत. अज्ञानी लोक यांना उगाच भिन्न मानतात. आकाश आणि अवकाश यांत फक्त शब्दाचा फरक. तशीच या दोहोंत केवळ शब्द-भिन्नता आहे.

योगयुक्त होऊन कर्में करणाराला त्यांचा लेप लागत नाहीं. ज्याची भ्रांति नष्ट झाली आणि गुरुवाक्याच्या तीर्थांत मन धुतल्यामुळें संकल्प-विकल्प मावळले, त्याची कर्मांची त्रिपुटी स्वभावतःच खुंटते. देहीं मीपणाचा आठव उरला नाहीं तिथें कर्तृत्व कुठलें!

जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें[1] । गुरुवाक्यें मन धुतलें ।
मग आत्मस्वरूपीं घातलें । हरौनियां ॥
जैसें समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें, अल्प आवडे[2] ।
मग होय सिंधूचि एवढें । मिळे जेव्हां ॥

१. काढून घेतलें. २. वाटतें.

तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें ।
तेणें एकदेशियें[1] परी व्यापिलें । लोकत्रय ॥

आतां, कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें ।
आणि करी जरी आघवें । तऱ्ही अकर्ता तो ॥

जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठवु नाही ।
तरी कर्तृत्व कैचें कायी । उरे सांगें ? ॥

—अ० ५ ओ० ३४ ते ३८

बाह्य दृष्टीनें पाहिलें तर ज्ञानीसुद्धां सामान्य जनांसारखाच दिसतो. इतरांप्रमाणेंच त्याचेहि शरीरव्यापार होतात. पण आत्मानुभवाच्या बळावर तो 'मी कर्ता' असें मानीत नाहीं. दिव्याच्या प्रकाशांत सगळे व्यवहार चालतात. पण दिवा कांहीं ते करीत नाहीं. तो केवळ साक्षी असतो. ज्ञानीहि तसाच. फलाकडे डोळे लावून कर्में करणाऱ्या अज्ञ जीवांप्रमाणेंच तो कर्में यथासांग करतो खरीं; पण 'मी या कर्मांचा कर्ता नव्हे' असें समजून तो त्यांची उपेक्षा करतो. अशा पुरुषाची योग्यता काय वर्णावी! तो प्रतिपरमेश्वरच होय!

परमात्मा वस्तुतः अकर्ता आहे; पण या त्रिभुवनाची रचना तोच करीत आहे असें वाटतें. त्याला कर्ता म्हणायला जावें तर कोणतेंहि कर्म त्याला स्पर्श करूं शकत नाहीं. त्याची योगनिद्रा कधींहि मोडत नाहीं. पहायला गेलें तर तो जगाच्या जीवीं आहे; पण तो कोणाचा कोणीहि नाहीं. जग उदित होतें आणि अस्ताला जातें याची त्याला गंधवार्ता देखील नसते.

पापपुण्य ईश्वराच्या जवळच असतें. पण तो त्यांचा केवळ साक्षी व्हायलासुद्धां राजी नसतो. मग देण्याघेण्याच्या गोष्टी कुठल्या? तो अवतार घेतो म्हणजे मूर्त होतो, पण तरीहि त्याचें अमूर्तपण बिघडत नाहीं. अशा स्थितींत जगाचे उत्पत्तिस्थितिसंहार तो करतो हें बोलणेंच व्यर्थ ठरतें.

---

१. व्याप्य.

परमेश्वरावर असा कर्तृत्वाचा आरोप करणें हेंच अज्ञान आणि ईश्वराचें अकर्तेपण प्रत्ययाला येणें हेंच ज्ञान. हा विवेक ज्याच्या चित्तांत उदित झाला त्याला त्रिभुवनांत भेदच शिल्लक उरत नाहीं. आपण सच्चिदानंद तसेंच जगहि सच्चिदानंद असें तो मानतो. सूर्याला अंधकार स्वप्नांत तरी कधीं दिसतो का? अमृतानें मृत्यूची कहाणी कधीं ऐकली आहे का? त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुषाला विषमता कुठें आढळतच नाहीं. सर्वत्र समताच तो पाहतो. आकार वेगवेगळे, काळे किंवा गोरे; पण सर्वांच्या अंतर्यामींचें आत्मतत्त्व एकच असें तो जाणतो. व्यक्ति किंवा आकार त्याच्या डोळ्यांना दिसतच नाहीं. त्या त्या आकाराच्या रूपानें त्याला दिसतो तो केवळ विश्वव्यापक श्रीहरि.

अशा महात्म्यांनीं देहांत असतांनाच जन्ममृत्यु जिंकले असें समजावें. देहधारी असले तरी ते ब्रह्मरूपच होत. मृगजळाचा पूर लोटला म्हणून पर्वत वाहून जात नाहीं, तसेंच हेहि बरेवाईट कसलेहि प्रसंग आले तरी विकार पावत नाहींत. ते कधीं इंद्रियांच्या गांवांत यायचेच नाहींत. विषयसुखाची प्रतिष्ठा कोणाला? जो संसारासक्त असेल त्याला. ज्याला आत्म्याच्या मंदिरांत निजानंदाची अमृतधारा सांपडली तो विषयभोगासाठीं तिथून बाहेर येतोच कशाला?

सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडलेनि अंतरें ।
रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घाली ।।
सांगें कुमुददळाचेनि ताटें[1] । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें[2] ।
तो चकोर काई वाळवंटें । चुंबितु असे ।।
तैसें आत्मसुख उपाइलें[3] । जयासि आपणपेंचि फावलें ।
तया विषयो सहज सांडवले । म्हणों काई ! ।।

—अ० ५ ओ० १०६ ते ८

१. कमलपत्राच्या. २. चांगलीं. ३. समृद्ध.

ज्यांना आत्मसुख लाधलें नाहीं त्यांनाच विषयांची गोडी वाटते. कोंड्याची भाकर गरिबांनींच खायची! सुखासाठींच विषयाचें सेवन केलें जातें पण खरोखरच विषयांत सुख आहे का?

## १७ विषयांत सुख नाहीं

एऱ्हवीं विषयीं सुख आहे । हें बोलणेंचि सौरिखें[1] नोहे ।
तरी विद्युत्स्फुरणीं कां न पाहे । जगामाजी ? ॥
सांगें वात[2] वर्ष[3] आतपु[4] वारे[5] । ऐसी अभ्रछायाचि जरी सरे[6] ।
तरी त्रिमाळिकें[7] धवळारें[8] । करावीं कां ? ॥
म्हणोनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणतां गा वायांचि जल्पिजे[9] ।
जैसें महूर[10] कां म्हाणिजे । विषकंदातें ॥
हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली ।
जे शीतल होईल केतुली[11] । मूषकासी ? ॥

—अ० ५ ओ० ११३ ते १७

पण काय करावें? अज्ञानी जीवांना त्यांतच आनंद वाटतो. बेडकासारखे ते ह्या विषयांच्या चिखलांतच रमतात. आणि म्हणूनच त्यांना जन्म-मरणाची दुर्गम वाट विश्रांति न घेतां चालावी लागते. विरक्त पुरुष मात्र यांना विषवत् मानून यांचा त्याग करतात. अर्जुना, तूंसुद्धां या विषयांच्या वाटेनें कधीं जाऊं नको हो! अनुभवी पुरुष वैराग्याच्या बळानें विषयांना बाहेर घालवतात. मन शरिराच्या ठिकाणीं एकनिष्ठ करतात. प्राण सुषुम्नेंत नेतात. प्राणापानांचें ऐक्य करून त्यांचा चिदाकाशांत लय करतात. त्यायोगें

---

१. योग्य. २. वारा. ३. पाऊस. ४. उन्ह. ५. निवारील. ६. योग्यतेची. ७. तीन मजली. ८. बंगले. ९. बडबडणें. १०. मधुर. ११. कितीशी.

वासनांचा आपोआप लय होतो आणि ज्या मनोरूप पडद्यावर हें संसारचित्र उमटलेलें असतें तो पडदा अवाचितपणें फाटून जातो. मन मनपणाला मुकलें कीं त्यांतला अहंकारहि सहजच मरून जातो. आणि मग ब्रह्मसुखाचा अनुभव घेणारा हा योगी शरिरानेंच ब्रह्म होतो.''

हा थोडासा योगमार्गाचा प्रस्ताव ऐकून अर्जुनाला त्याच्याविषयीं जिज्ञासा उत्पन्न झाली आणि श्रीकृष्णानें ती पुरविण्याचें ठरवलें. अर्जुनाची इच्छा देवानें पुरवली नाहीं असें कधीं झालें आहे का ? अर्जुन म्हणजे परमात्म्याच्या प्रेमाचें निधान ! ज्ञानेश्वर म्हणतात—

आधींच चित्त मायेचें । वरी मिषें[1] जाहलें पढियंतेयाचें[2] ।
आतां तें अद्भुतपण स्नेहाचें । कवण जाणे ॥
ते म्हणों कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवया स्नेहाची सृष्टि ।
हें असो नेणिजे दृष्टि । हरीची वानूं ॥
जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिऊन मातली ।
म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणे ॥

—अ० ५ ओ० १७० ते ७२

## १८ ज्ञानेश्वरांचा मराठी भाषेचा अभिमान

संतसज्जनहो ! यापुढें योगशास्त्राचा विषय येणार असून तो फार महत्त्वाचा आहे. हा कानांनीं ऐकून बुद्धीनें जाणायचा आहे. गीतार्थाचें सार यांत निघालें आहे. योगवैभवाचा हा जामदारखानाच उघडला आहे म्हणाना ! रसाळ मराठी भाषेंत मी त्याचें विवेचन करीन. माझें भाषण साहित्यगुणांनीं नटलेलें आणि अलंकारांनीं भरलेलें असेल.

माझा मराठाचि बोलु कौतुकें । परी अमृतातेंही पैंजा जिंके ।
ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥

१. निमित्त. २. आवडत्याचें.

जिये कोंवळिकेचेनि[1] पाडें[2] । दिसती नादींचे[3] रंग थोडे ।
वेधें परिमळाचें बीक[4] मोडे । जयाचेनि ॥

ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा ।
बोलें इंद्रियां लागे कळंभा[5] । एकमेकां ॥

सहजें शब्दु तरी विषो[6] श्रवणाचा । परी रसना म्हणे रस हा आमुचा ।
घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥

नवल बोलतिये रेखेची वाहणी । देखतां डोळ्यांही पुरों लागे धणी ।
ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥

जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें ।
बोलु भुजांहीं आविष्करे[7] । आलिंगावया ॥

—अ० ६ ओ० १४ ते १९

## १९ योगसाधना

योग हें आत्मज्ञानाचें एक महत्त्वाचें साधन आहे. इंद्रियरूपी नाठाळ घोडे जीवाला विषयांच्या आडरानांत नेऊन घालतात. त्यांना आवरल्यावांचून आणि मनाचें स्वच्छंद भटकणें बंद होऊन तें स्थिर झाल्यावांचून आत्मलाभ होणें अशक्य आहे. इंद्रियजय आणि मनोजय या गोष्टी योगमार्गानें साध्य होतात. या योगाला राजयोग असें नांव आहे. याचीं आठ अंगें असल्यामुळें याला अष्टांगयोग असेंहि म्हणतात. 'यमनियमासनप्राणायामप्रत्याहारधारणाध्यानसमाधयोऽष्टांगानि' हीं त्या आठ अंगांचीं क्रमानें नांवें आहेत.

या आठ अंगांपैकीं सातवें अंग जें ध्यान, त्याचाच विचार भगवंतांनीं मुख्यत्वेंकरून अर्जुनाला सांगितला आहे. या ध्यानयोगाचा अभ्यास करायचा तर त्याच्या मागच्या सहा अंगांची मदत हवी. एकदम ध्यानच तेवढें

१. कोमलतेच्या. २. तुलनेनें. ३. ध्वनींतले. ४. बळ ५. कलह. ६. विषय. ७. पुढें येतो.

करूं म्हटलें तर तें जमणार नाहीं. ज्ञानेश्वर या योगमार्गाची प्रशंसा करतात--

"हा योग असा आहे कीं, त्याच्या आचरणानें मोक्षप्राप्ति होते. भगवान् कैलासनाथ अजूनहि या मार्गाची यात्रा करीत आहेत. पूर्वीचे महर्षि याच मार्गानें गेले आणि साधकांचे सिद्ध बनले. हा मार्ग दिसतो तेव्हां तहानभूक हरते. रात्र का दिवस याचें भान राहत नाहीं. आणि चालूं लागलें कीं पावलापावलाला मोक्षाच्या खाणी उघडतात.

योगसाधन ज्याला करायचें असेल त्यानें नगरांत किंवा जनसंमर्दांत राहतां कामा नये. दूर कुठेंतरी जावें. विजनवास पत्करावा. ज्या ठिकाणीं बसायचें असेल तें स्थान रम्य असावें. जिथें मनाला उत्साह चढेल, संतोष वाढेल, पाखंड्यालाहि तप करावेंसें वाटेल आणि सहजपणें वैराग्य उत्पन्न होईल असा त्या स्थानाचा गुण असावा.

तिथें गोड फळांनीं भरलेलीं झाडें असावीं. पावलापावलाला निर्मळ झरे असावे. मंद आणि शीतल असा वारा वाहत असावा. अशा ठिकाणीं साधकानें मठ बांधावा. संत किंवा साधक यांची सोबत असली तर उत्तमच; पण इतरेजनांचा मात्र संपर्क नसावा.

अशा मनोहर एकांतस्थळीं साधकानें आपलें आसन तयार करावें. खालीं न मोडलेले दर्भांकुर, वर धूतवस्त्राची घडी आणि त्यावर मृगाजिन असें मध्यम उंचीचें आसन असावें. त्यावर बसून 'मूळ', 'जालंधर' आणि 'ओढियाणा' हे बंध साधावे. ताठ बसावें. पाठ आणि मान हीं सरळ रेषेंत ठेवावीं. दृष्टि नासाग्रीं लावावी. असा हळूहळू अभ्यास वाढवावा. असें केलें असतां मूळबंधानें कोंडलेला अपान वायु वर सरून फुगा धरतो व मणिपूर चक्राशीं झुंजूं लागतो. त्यामुळें पोटांत ढवळाढवळ सुरू होते आणि लहानपणापासून आंत सांचलेली घाण बाहेर निघूं लागते. तोच वायु पुढें कोठ्यांत शिरून कफपित्तांचा नाश करतो. सप्त धातूंचीं स्थानें धुंडाळतो. मेद वितळवतो. हाडांचा रस शोषून घेतो. नाड्या सोडवतो. आणि सारे अवयव शिथिल करून साधकाला भीति उत्पन्न करतो. पण त्यानें घाबरतां कामा नये. त्यानंतर आसनाच्या उष्णतेनें कुंडलिनी शक्ति हळूहळू जागृत होऊं लागते.

नागिणीचें पिलूं कुंकवाच्या द्रवानें न्हाऊन वेंटाळें करून निजावें तशी ही कुंडलिनी साडेतीन वेढे घालून अधोमुख झोंपलेली असते. ती नाभिकंदाला चिकटलेली असते. मूळबंधाचा चिमटा बसला कीं ती जागी होते. फार दिवसांची भुकेली असल्यामुळें जागी झाल्यावर ती आवेशानें मुख पसरते आणि तोंडांतल्या ज्वालांनीं साधकाच्या शरिरांतलें रक्तमांस निपटूं लागते. असा सगळयाचा ग्रास झाला कीं मग ती सौम्य होते व सुषुम्ना नाडीजवळ पडून राहते. त्या ठिकाणीं तृप्तीच्या भरांत ती जें गरळ ओकते तें अमृतरूप असतें आणि त्याच्या योगानें साधकाचें प्राणरक्षण होतें. अंगाचा दाह शमतो आणि गेलेली शक्ति पुनश्च हळूहळू येऊं लागते. त्यानंतर भ्रुकुटीमध्यें असलेलें चंद्रामृताचें तळें धक्का बसून वांकडें होतें आणि त्यांतलें अमृत थेंबाथेंबानें कुंडलिनीच्या मुखात पडूं लागतें. तो अमृतरस मग साधकाच्या अंगांत मुरतो. त्यामुळें शरीर सूर्यासारखें तेजस्वी दिसूं लागतें. आणिमादि अष्ट सिद्धि प्राप्त होतात. त्याला सातासमुद्रांपलीकडचेंहि दिसूं लागतें. स्वर्गांतले शब्द ऐकूं येतात आणि मुंगीच्या मनांतला भावहि कळतो. तो वायूवर स्वार होतो. पाण्यावरूनहि चालत जाऊं शकतो. नानाप्रकारचे चमत्कार त्याला करतां येतात.

पण ज्यांची दृष्टि आत्मफलावर स्थिर झालेली असते ते सिद्धींना न भुलतां अभ्यास चालू ठेवतात. पुढें मग तीच कुंडलिनी प्राणवायूचा हात धरून सुषुम्नेच्या जिन्यानें हृदयांत येते आणि जगद्बीजाचा अंकुर जो जीव त्याच्यावर सावली करते. मग तिथें अखंड ओंकाराचा ध्वनि उठतो. यालाच ‘अनाहतध्वनि’ असें म्हणतात. या ध्वनीनें हृदयाकाश दुमदुमूं लागलें कीं ब्रह्मरंध्राची खिडकी आपोआप उघडते. त्याद्वारें ती कुंडलिनी आंत शिरून ‘अहं ब्रह्मास्मि’ या भावनेनें बाहु पसरून परब्रह्माला मिठी मारून तिथें एकवटते त्या वेळीं पंचमहाभूतांचा पडदा फाटतो आणि शिव-शक्तींचें ऐक्य होतें. जीवात्मा ब्रह्मपदीं प्रविष्ट होतो. नंतर मी निराळा, आत्मा निराळा किंवा दोन्ही एक ही वाटाघाटच शिल्लक उरत नाहीं. त्या अवस्थेंतला अनुभव शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं. तिथें शब्द मुका होतो. संकल्प मावळतो. विचारहि नष्ट होतो. फार काय, अनुभव घेणाराच अनुभवरूप बनतो.”

३

## २० योगभ्रष्टाची गति

त्यावर अर्जुनानें प्रश्न विचारला कीं, " देवा, या योगमार्गानें जात असतां पूर्ण फल हातीं येण्याच्या आंतच जर साधकाचा मृत्यु झाला तर त्याची वाट काय? योग हा प्रयत्नानें आणि दीर्घकालानें साध्य होणारा असून आयुष्याचा तर मुळींच भरवंसा नाहीं. काळ त्याला केव्हां चघळून टाकील तें कोणीं सांगावें! बुडबुडा फुटला कीं खलास! अशा स्थितींत साधकानें केलेले आटोकाट परिश्रम वायांच जायचे का? अशा योगभ्रष्टाची स्थिति पुढें काय होते? त्याला कोणती गति मिळते? माझा हा संशय फेडशील का?"

त्यावर देव म्हणाला कीं, " अर्जुना, एक गोष्ट पक्की लक्षांत ठेव कीं, सन्मार्गाचें आचरण करणारा कधींहि दुर्गतीला जाणार नाहीं. तो या जन्मीं जें करील तें त्याला पुढच्या जन्मीं उपयोगी पडेल. दूरचा प्रवास असला तर माणसाला मधें कुठेंतरी एक वा अनेक मुक्काम करावे लागतात. पण प्रत्येक मुक्कामाला जेवढी वाट त्यानें आक्रमिली असेल तेवढी त्याच्या पदरांत पडते. तसेंच या योगाचें आहे. मागच्या जन्माचा अभ्यास या जन्मीं उपयोगी पडतो. या जन्मींचा पुढच्या जन्मीं. अशा रीतीनें एक दिवस तो आपला अखेरचा मुक्काम गांठतो आणि कृतकृत्य होतो. मध्यंतरीं त्याला जे जन्म मिळतात ते चांगल्या ठिकाणीं मिळतात. कधीं तो धर्मनिष्ठ श्रीमंताच्या घरीं जन्म घेतो तर कधीं योगिराजाच्या कुलांत. तो कुठेंहि जन्मो, मागची सगळी अभ्याससमृद्धि बालपणींच त्याला येऊन वरते.

मोटेकी[1] देहाकृति उमटे। आणि निजज्ञानाची पहांट फुटे।
सूर्यापुढें प्रकटे। प्रकाशु जैसा॥

तैसी दशेची[2] वाट न पाहतां। वयसेचिया[3] गांवा न येतां।
बाळपणींच सर्वज्ञता। वरी तयातें॥

---

१. लहानशी. २. मोठें होण्याची. ३. म्हातारपणाच्या.

तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें[1] दुभे[2] ।
मग सकळशास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥

–अ० ६ ओ० ४५२ ते ५४

पूर्वजन्मीं ज्या वेळीं आयुष्याचा शेवट झाला असेल त्या वेळची सद्बुद्धि त्याला लाभते. पायाळू माणसाच्या डोळ्यांत दिव्य अंजन पडलें म्हणजे त्याला जसे भूमिगत धनाचे ठेवे स्वच्छ दिसूं लागतात, त्याच प्रकारें अशा योगभ्रष्ट पुरुषाला गुरुगम्य, दुर्बोध अभिप्राय आपोआप कळूं लागतात. त्याची बुद्धि नेमकी त्या ठिकाणीं जाते. तो अभ्यासाकडे जाण्याच्याऐवजीं अभ्यासच त्याच्याकडे धांवत येतो. सगळीं साधनें त्याच्या मागोमाग जातात. तो उपजतांक्षणींच त्याची लग्नघटिका बुडते आणि तद्रूपतेशीं ‘ सुमुहूर्तें सावधान ’ होतें.

## २१ ज्ञान-विज्ञान

अर्जुना, आतां तुला ज्ञान आणि विज्ञान हीं काय आहेत तें सांगतों. तूं म्हणशील, ‘ मला विज्ञान कशाला हवें ? ज्ञान मिळालें कीं पुरे. ’ पण तसें नाहीं. ज्ञानाच्या आधीं विज्ञान काय आहे तें समजून घेतलें पाहिजे. कारण ज्ञानानुभवांत निमग्न झाल्यावर मग विज्ञानाचा अनुभव यायचा नाहीं. सूर्य-प्रकाशानें जग भरून गेलें म्हणजे त्या वेळीं चांदणें कुठलें ? अर्थात् त्याचें स्वरूप आधीं समजावून घेणें हें योग्य.

तैसी जाणीव जेथ न रिघे । विचार मागुता पाउलीं निघे ।
तर्कु आयणी[3] नेघे । आंगीं जयाच्या ॥
अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंचु हें विज्ञान ।
तेथ सत्यत्वबुद्धि तें अज्ञान । हेंहि जाण ॥

–अ० ७ ओ० ५ ते ६

१. वाङ्मयानें. २. पाझरते. ३. बळ.

जिथें बुद्धीचा प्रवेश होत नाहीं, विचार मागें पाऊल घेतो आणि तर्क कच खातो असें जें केवळ अनुभवैकगम्य तें ज्ञान. प्रपंच हें विज्ञान. आणि या प्रपंचाच्या ठिकाणीं सत्यत्वबुद्धि धारण करणें, तो खरा आहे असें मानणें हें अज्ञान होय. विज्ञान आणि अज्ञान यांचा निरास करून मूर्तिमंत ज्ञान प्रकट होतें.

अर्जुना, आतां विज्ञानाचा विस्तार ऐक. पंचमहाभूतें, मन, बुद्धि आणि अहंकार हीं आठ तत्त्वें मिळून अष्टधा प्रकृति तयार होते. हिच्यापासून त्रैलोक्य उत्पन्न होतें. हिला अपरा प्रकृति असें म्हणतात. यावांचून दुसरी एक प्रकृति आहे. ती जीवभूत अथवा क्षेत्रज्ञरूप असून तीच जडाला चेतवते आणि जगाला जीवविते. ही सूक्ष्म प्रकृति जेव्हां स्थूल प्रकृतीशीं संलग्न होते तेव्हां या भूतसृष्टीची टांकसाळ उघडते. मग चार खाणी आणि चौऱ्यायशीं लक्ष योनि उत्पन्न होऊन त्या नाण्यांनीं आदिशून्याचा गाभारा भरून जातो. ही प्रकृति भूतांचा विस्तार करते आणि कल्पांतीं सगळ्यांची पुनश्च आटणी करते. माझ्या सत्तेनें प्रकृतीचें हें उभारणी–संहारणीचें कार्य चालतें. ही प्रकृति माझ्याहून निराळी नाहीं. ती माझ्याच ठिकाणीं प्रतिबिंबित होते. अर्थात् हें ब्रह्मांड मीच निर्माण करतों. त्याच्या आधीं, मधीं आणि अखेर मीच आहे असें समज. सोन्याचे मणि करून ते सोन्याच्याच सांखळींत गुंफावे तसें हें सगळें जग मजमध्यें गोंवलेलें आहे. त्याच्या बाह्याभ्यंतरीं मीच आहें.

या विश्वाचें बीज मीच आहे. याचे सात्त्विक, राजस व तामस भाव हे माझ्या रूपापासूनच उत्पन्न झालेले आहेत. पण हे भाव माझ्या ठिकाणीं असले तरी मी मात्र त्यांच्यामध्यें नाहीं. बीजापासून खोड होतें, पण खोडांत बीज नसतें. ढगांत पाणी असतें, पण पाण्यांत ढग नसतात. अग्नीपासून धूर उत्पन्न होतो, पण धुरांत अग्नि नसतो. तसेंच विकार जरी मजपासून अंकुरत असले तरी विकारांत मी नाहीं.

पण जगाला माझें हें अलिप्तपण कळत नाहीं. विकारांनीं जग मोहित झालें आहे. त्रिगुणात्मक प्रकृतीच्या तळाशीं असलेला मी परमात्मा जगाला दिसून येत नाहीं. ही त्रिगुणात्मक माया माझीच खरी; पण तिनें मलाच झांकून टाकलें आहे. ही आत्मस्वरूपाच्या आड कशी येते आणि तिच्या योगानें आत्मा हा स्वरूपाला विसरून जीवदशेला कसा पोंचतो तें ऐक.

## २२ मायानदी

परी उदकीं जाली बोंबुळी[1] । ते उदकातें जैसी झांकोळी ।
का वायांची आभाळीं[2] । आकाश लोपे ॥
हें असो; डोळ्यांचें । डोळांचि पडळ रचे ।
तेणें देखणेंपण[3] डोळ्यांचें । न गिळिजे काई ? ॥
तैसी हे माझीच बिंबली । त्रिगुणात्मक साउली ।
कां मजचि आड वोडवली । जवनिका[4] हे ॥
म्हणऊनि भूतें मातें नेणती । माझींच परी मी नव्हती ।
जैसीं जळींचीं जळीं न विरती । मुक्ताफळें ॥
तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव ।
परी मायायोगें जीव- । दशे आले ॥

–अ० ७ ओ० ६० ते ६६

पाण्यावर शेवाळ दाटतें आणि पाण्यालाच झांकून टाकतें. आकाशांत मेघ उत्पन्न होतात व आकाशालाच लोपवतात. तशी माझ्याच ठिकाणीं भासलेली, ही माझीच माया माझ्याच स्वरूपाच्या आड येते. आणि त्यामुळें प्राणिमात्र मला जाणत नाहींत. पाण्यातच उत्पन्न झालेलीं मोत्यें पाण्यांत जशीं विरघळत नाहींत तशीं सर्व भूतें माझींच असून माझीं नसल्यागत होतात. माझीं असून मलाच ओळखीत नाहींत.

माया ही एक महादुस्तर नदी आहे. हिला भ्रांतीचा महापूर आलेला आहे. द्वेषाचे भोंवरे आणि मत्सराचे वळसे हिच्यांत जागोजाग आहेत. प्रमादादिक मोठमोठे मासे हिच्यांत संचार करतात. विषयांच्या लाटा उसळतात. सुखदुःखांचा पालापाचोळा वर तरंगत असतो. जीवाच्या पुढें ही

१. शेवाळ. २. ढगांनीं. ३. पाहण्याची शक्ति. ४. पडदा.

अफाट पसरली आहे. हिच्या पैलपार जावें तेव्हां परमात्मा भेटावा. हिच्यांतून तरून जाण्याचे आजवर अनेकांनीं अनेक प्रयत्न केले; पण ते सारे विफल होऊन त्यांची दुर्दशा झाली. कोणीं बुद्धिरूप बाहुबलाच्या घमेंडीनें हिच्यांत उडी टाकली; पण ते कुठें गडप झाले त्याचा पत्ताच नाहीं. कोणीं वेदांची सांगड केली आणि तिला अहंभावाचे दगड बांधून हिच्यांत शिरले, त्यांना मदरूपी माशानें सगळेंच गिळून टाकलें. कोणीं यज्ञयागादि क्रियांची पेटी पोटाखालीं घेऊन आंत अंग टाकलें, ते स्वर्गाच्या कपारींतच अडकून बसले. या ना त्या प्रकारें सगळेच हिच्यामध्यें बुडाले. मग तरले तरी कोण?

येथ एकचि लीला[1] तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥
जयां सद्गुरु तारूं फुडें[2] । जे अनुभवाचे कासे गाढे ।
जयां आत्मनिवेदन तरांडें । आकळलें ॥
जे अहंभावाचें बोझें सांडुनी । विकल्पाचिया झुळुका चुकाउनी ।
अनुरागाचा निरुता होउनी । पाणिढाळु ॥
जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडला तारा ।
मग निवृत्तीचिया पैलतीरा । झेपावले जे ॥
ते उपरतीच्या[3] वांवीं[4] सेलतें[5] । सोहंभावाचेनि थावें[6] पेलत ।
मग निघाले अनकळित[7] । निवृत्तितटीं ॥
येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले ।
परी ऐसे भक्त विर्पाइले[8] । बहुवस नाहीं ॥

—अ० ७ ओ० ९७ ते १०२

१. सहजपणें. २. दृढ. ३. वैराग्याच्या. ४. हातांना. ५. सुरकांड्या मारतात. ६. बळानें. ७. अनायासें. ८. विरळा.

सद्गुरूला शरण जाऊन जे अनुभवीं दृढ झाले असे माझे भक्तच ही मायानदी सुखानें पार करतात. पण असे भक्त फारच थोडे असतात. आतां तुला भक्तांचे प्रकार सांगतों.

## २३ चार प्रकारचे भक्त

पहिला आर्त. हा आपली पीडा दूर व्हावी म्हणून मला भजतो. दुसरा जिज्ञासु. हा माझें तत्त्व जाणण्याच्या इच्छेनें भजन करतो. तिसरा अर्थार्थी, हा वैभवाच्या कामनेनें भक्ति करतो. चवथा ज्ञानी. याला कांहींच मागायचें आणि घ्यायचें नसतें. ज्ञानाच्या प्रकाशानें त्याचा भेदाभेदाचा अंधकार नष्ट झालेला असतो. तो माझ्याशीं समरस असतो. ज्ञानी भक्त हाच खरा भक्त होय. तोच सर्वांत श्रेष्ठ. तोच भगवंताला अधिक आवडतो. किंबहुना ज्ञानी हा भगवंताचा आत्माच होतो. त्याला कसलीच इच्छा उरलेली नसते. तो देवाच्या दारींचा भिकारी नसतो.

हे ज्ञान मिळवायला अनेक जन्मांची तपश्चर्या लागते. विषयांच्या रानांतून कामक्रोधरूपी वाटमाऱ्यांना चुकवीत व अप्रवृत्तीच्या आडवाटा डावलीत जो धांवत सुटला तोच एक दिवस गुरुकृपेनें ज्ञानवान् होतो. मग 'वासुदेवः सर्वम्' ही अनुभवाची बैठक त्याला मिळते. असें झालें म्हणजे त्याला सर्वत्र मीच दिसूं लागतों. त्याला देवाचा सुकाळ होतो. नदीच्या डोहांत घागर बुडवली कीं तिच्या आंतहि पाणी आणि बाहेरहि पाणीच.

> तैसा तो मज भीतरीं । मी तया आंतबाहेरी ।
> हें सांगिजेल बोलवरी । तैसें नव्हें ॥
>
> —अ० ७ ओ० १३४

असा ज्ञानी भक्त—असा महात्मा—विरळाच असतो !

## २४ ब्रह्म, अध्यात्म आणि कर्म

जें या सच्छिद्र शरिरांत असून त्यांतून कधीं झिरपत नाहीं आणि अत्यंत सूक्ष्म असूनहि या प्रपंचाच्या झोळींतून खालीं गळत नाहीं तें 'ब्रह्म' होय.

आकार जन्मला तरी जें कधीं जन्मत नाहीं आणि आकाराचा नाश झाला तरी जें मरत नाहीं असें हें ब्रह्मतत्त्व ज्या आपल्या सहजस्थितींत सदैव असतें त्याला 'अध्यात्म' म्हणतात. निराकार आणि शुद्ध अशा परब्रह्मापासून 'प्रकृति', 'अहंकार' एथपासून ब्रह्मांडरचनेला प्रारंभ होतो. निर्विकल्प ब्रह्माच्या जमिनींत 'एकोऽहं बहु स्याम्' या आदिसंकल्पाचें बीज पडतें आणि तें लगेच अंकुरित होऊन वाढूं लागतें. थोड्याच काळांत त्याला ब्रह्मगोलकांचीं भरघोस कणसें येतात. पुढें त्यांतला प्रत्येक कण आपापल्यापरी सृष्टीची वाढ करूं लागतो. अशा रीतीनें स्थावरजंगमात्मक विश्वाची रचना होते. त्यांत सम-विषमभावहि उत्पन्न होतो. लक्षावधि जातीहि वेगळेपणें संसार थाटतात. ही सृष्टि कशी झाली आणि कोणीं उत्पन्न केली याचा तलास करूं गेल्यास मुदलांत कर्ताच कोणी सांपडत नाहीं. बरें, कारण पाहावें तर तेंहि दिसत नाहीं. मधल्यामधें सृष्टिरूप कार्य मात्र दिसतें. असा कर्त्यावांचून अव्यक्त परब्रह्माच्या ठिकाणीं दिसणारा हा जो अवाढव्य जगदाकार, त्याला 'कर्म' असें म्हणतात.

## २५ अधिभूत, अधिदैवत आणि अधियज्ञ

जें पंचमहाभूतांच्या मिश्रणानें बनलें आहे, ज्याला नाम आणि रूप आहे व भूतसंयोग बिघडला कीं जें नाश पावतें तें तें सगळें 'अधिभूत' असें समज. प्रकृतीनें उत्पन्न केलेल्या पदार्थांचा उपभोग घेणारा, इंद्रियप्रांतांतला मुख्य अधिकारी, देहांतीं संकल्पविकल्परूपी पांखरांचा विसाव्याचा वृक्ष आणि या भौतिक शरिरांत जो 'जीव' या नांवानें वस्ती करतो, त्याला 'अधिदैवत' म्हणतात. आणि या देहाकारांत शरीरबुद्धीचा लोप करणारा जो मी परमात्मा, त्याला 'अधियज्ञ' अशी संज्ञा आहे.

## २६ ज्ञान्यांना देहत्यागाचें दुःख नाहीं

या अधियज्ञाला म्हणजे परमात्म्याला ज्यांनीं जाणलें, अंतर्बाह्य तोच एक भरून उरला आहे असा ज्यांचा अनुभव दृढ झाला, आणि ब्रह्मरूप झाल्यामुळें ज्यांना ब्रह्माशिवाय कसलेंच स्मरण उरलें नाहीं अशा महात्म्यांचें देहाचें मोटळें गळून पडलें तरी त्यांना त्याचें यत्किंचितहि दुःख होत नाहीं. देह पडला तरी

त्यांचा ब्रह्मानुभव ढळत नाहीं. त्यांची अनुभूति अशी डळमळीत अथवा लेचीपेची नसते.

ते ऐक्याची आहे वोतिली । कीं नित्यतेच्या हृदयीं घातली ।
जैसी समरसमुद्रीं धुतली । रुळेचिना ॥
पैं अथांवीं घट बुडाला । तो आंतबाहेरी उदकें भरला ।
पाठीं दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे ? ॥
तैसा आकारु हा आहाच अंशे । वांचूनि वस्तु ते संचलीच असे ।
तोचि बुद्धि जालिया विसकुसे । कैसेनि आतां ? ॥

--अ० ८ ओ० ६४ ते ६७

याप्रमाणें देहावसानसमर्थी जे महात्मे ब्रह्मबुद्धि धारण करून देह सोडतात ते मद्रूप होतात. यासाठीं अर्जुना, तूं संसाराची आसक्ति सोडून सदैव माझेंच स्मरण ठेव. तुझ्या मनबुद्धि माझ्या ठिकाणीं अर्पण कर. म्हणजे तूं माझ्याच स्वरूपीं मिळून जाशील. मी हें प्रतिज्ञेवर सांगतों. अभ्यासाच्या बळानें तुझ्या चित्ताला तूं परमपुरुषाची मोहोर लावलीस कीं शरीर गेलें काय अथवा राहिलें काय, त्याची तुला पर्वा राहणार नाहीं. चित्तानें एकदां परमात्म्याला वरलें कीं त्याला देहाचा आठव उरत नाहीं. नदी समुद्राला मिळाली कीं मागें काय चाललें आहे तें पाहायला परत फिरत-नाहीं. ब्रह्मरूप झालेले महात्मे मृत्युकाळीं अगदीं शांत असतात. त्यांची तिळभरहि तगमग होत नाहीं.

भक्तांची स्थिति तर याहून निरालीच असते. ते मला जन्मभर आपल्या हृदयांत ठेवून जोपासीत असल्यामुळें त्यांनीं मला स्मरावें आणि मग मीं त्यांना पावावें ही गोष्टच शिल्लक उरत नाहीं. ते सदैव माझे आणि मी सदैव त्यांचा असतों. खरें सांगायचें तर माझ्या अनन्यभक्तांचा मी ऋणको आहें. त्यांच्या ऋणाचें पर्वतप्राय ओझें मी नेहमीं शिरीं वाहत असतों. हें त्यांचें ऋण अंशतः तरी फिटावें म्हणून अंतकाळीं मी त्यांची परिचर्या करतों.

१. डोहांत. २. ब्रह्म. ३. कष्टी होईल.

तें ऋणवैपण[1] देखोनि अंगी । मीं आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं ।
भक्तांचिया तनुत्यागीं । परिचर्या करीं ॥
देहवैकल्याचा वारा । झणें लागेल या सुकुमारां ।
म्हणोनि आत्मबोधाचे पांजिरां[2] । सूये[3] तयांतें ॥
वरी आपुलिया स्मरणाची उवाँइली[4] । हींव ऐसी करीं साउली ।
ऐसेनि नित्यबुद्धि संचली । मी आणीं तयांतें ॥
म्हणोनि देहांतींचें सांकडें । माझियां कहींचि नपडे ।
मी आपुलियातें आपुलीकडे । सुखेंचि आणीं ॥

—अ० ८ ओ० १३१ ते ३४

माझे भक्त माझ्या स्वरूपापासून कधींहि ढळत नाहींत. इंद्रवरुणादि देव अमर खरे; पण महाप्रळयाच्या जळांत तेहि विरघळतात. परंतु माझे भक्त कधींहि जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडत नाहींत. ते ज्या ठायाला जातात तो ठायच आपण बनतात. एकदां ते शिवस्वरूप झाले कीं मग कधींहि जीव-दशेला परत येत नाहींत. उंसाची एकदां साखर बनली कीं तिचा परत ऊंस व्हायचा नाहीं. दुधाचें तूप झाल्यावर पुनश्च तें दूधपणाला येत नाहीं. त्याचप्रमाणें मला जे मिळाले, त्यांना पुनरावृत्ति नाहीं.

## २७ भ्रांत जीव विषयांतच रमतात

श्रीहरि म्हणाला, " अर्जुना, तूं सच्छिष्य आहेस. शुद्ध बुद्धीचा आहेस. आनिंदक आहेस. यासाठीं प्रपंचज्ञानासह शुद्ध ज्ञानाचा मी तुला उपदेश करणार आहें. हें ज्ञान सर्व ज्ञानांत उत्तम आहे. तें रहस्यांचा राजा आहे. तें पूर्ण सुखमय आहे. आणि तें मिळवण्याचा मार्गाहि सुखाचा आहे. तें एकदां हाताला चढलें कीं कधींच नाश पावत नाहीं. भोगून संपत नाहीं कीं विटत नाहीं.

१. कर्जबाजारीपणा. २. पिंजऱ्यांत. ३. घालतों. ४. शांत.

पार्था, तूं यावर अशी शंका घेशील कीं, 'स्वार्थासाठीं लोक जळत्या आगींतहि उडी घालायला कमी करीत नाहींत. मग एवढें पवित्र आणि उत्तम ज्ञान लोकांनीं आजवर उपेक्षिलें कां?' शंका रास्त आहे. पण तिचें उत्तर हेंच कीं, लोकांच्या मनांत त्या ज्ञानाविषयीं श्रद्धा नाहीं. आत्मवस्तु म्हणून कांहींतरी आहे आणि ती सुखमय आहे ही त्यांना जाणीवच नाहीं. ते संसारांतल्या सुखाभासावरच खुष असतात."

पाहें पां दूध पवित्र आणि गोड। पासीं त्वचेचिया पदराआड।
परी तें अव्हेरूनि गोचिड। अशुद्ध काय न सेविती? ॥
कां कमलकंदा आणि दर्दुरी। नांदणूक एकेचि घरीं।
परी परागु सेविजे भ्रमरीं। येरां चिखलुचि उरे ॥
नातरी निदैवाच्या परिवरीं। लोह्यों रुतलिया आहाति सहस्रवरी।
परी तेथ बैसोनि उपवास करी। कां दरिद्रें जियें ॥
तैसा हृदयामध्यें मी रामु। असतां सर्वसुखाचा आरामु।
कां भ्रांतासि कामु। विषयांवरी ॥

—अ० ९ ओ० ५७ ते ६०

मी परमात्मा प्रत्येकाच्या हृदयांत असतों. मी सर्व सुखांचें विश्रांतिस्थान आहे. पण मायेनें पछाडलेले जीव मला न भजतां विषयांचीच कामना धरतात. मृगजळाला भुलून तोंडांतला अमृताचा घोट थुंकून टाकतात.

## २८ परमात्मा केवळ साक्षीभूत

मी सर्वत्र भरलेला आहें. हें विस्तारलेलें जग म्हणजे मीच आहें. दूध विरजलें कीं तेंच दहीं बनतें. तसेंच अव्यक्तपणें थिजलेलें माझें रूप पातळ होऊन विश्वाकारानें पघळतें. हीं सर्व भूतें पाण्यावर फेस यावा तशीं मजवर

१. रक्त. २. बेडूक. ३. दुर्दैव्याच्या. ४. जवळच. ५. द्रव्याचे हंडे.

भासतात. पण मी मात्र त्या भूतांत नसतों. फेसांत पाणी असतें का? तसाच मीहि भूतांत नाहीं. आणि प्रकृतीच्या पलीकडचें माझें रूप, कल्पना टाकून तूं पाहशील तर, मजमध्यें भूतें आहेत हें म्हणणेंसुद्धां मिथ्या ठरेल. हें सर्वच जर मी आहें तर भूतें मजवेगळीं उरतील कुठें! संकल्पाची सांजवेळ झाली कीं क्षणभर बुद्धीचे डोळे तमोव्याप्त होतात आणि अखंडित अशा आत्मतत्त्वाच्या ठिकाणीं भिन्न भिन्न भूतांचा भास होऊं लागतो. आणि संकल्प अथवा कल्पना ज्ञानदीपाच्या प्रकाशानें नष्ट झाली कीं भूताभास नाहींसा होऊन एकटें परब्रह्म अखंड आणि अविकृत स्वरूपांत शिल्लक उरतें.

एरव्हीं तरी भूमीआंतूनि स्वयंभ। काय घडेया गाडगेयांचे निघती कोंभ।
परी ते कुलालमतीचे गर्भ। उमटले कीं ॥
नातरी सागरींच्या पाणी। काय तरंगांच्या आहाति खाणी।
ते अवांतर करणी। वारयाची नव्हे ? ॥
सांगें पडिसादाचीं प्रत्युत्तरें। कां आरिसां जें ओविष्करे।
तें आपुलें कीं साचोकारें। तेथेंचि होतें ? ॥
तैसिये निर्मळ माझ्या स्वरूपीं। जो भूतभावना आरोपी।
तयासि तयाच्या संकल्पीं। भुताभासु असे ॥

—अ० ९ ओ० ७८ ते ७९

हीं सर्व भूतें मी उत्पन्न करतों असें कोणी म्हणतात; पण खरोखर मी या भूतांचें कांहींच करीत नाहीं. जें कांहीं करणेंसवरणें तें प्रकृतिच करते. मी फक्त तिला अधिष्ठान होतों. माझा आधार मिळाला कीं तीच विश्वाकारानें व्यक्त होते. अमुक एक नगर अमक्या तमक्या राजानें वसवलें असें म्हणण्याचा प्रघात आहे. पण तें नगर उभारतांना राजाचे हात दमतात का? त्याच्या सत्तेवर सुतार, मजूर, गवंडी हेच लोक त्याची उभारणी करतात. बरें, मी प्रकृतीचा स्वीकार करतों तो तरी कसा? स्वप्नांतून जागृतींत यावें

१. दिसतें. २. खरोखर.

तसा. स्वप्नदर्शेतून जागृत दर्शेत येतांना प्रवास का करावा लागतो ? का पाय दुखतात ? मलाहि प्रकृतीचें अधिष्ठान होतांना कसलेच श्रमसायास पडत नाहींत. प्रकृतीचा संग करणें एवढेंच माझें काम. बाकी सगळें ती करते.

अर्जुना, तुला जर मजविषयींची खरीखुरी आवड असेल तर मी सांगितलेली उपपत्ति तूं विसरूं नको. एवढा वेळ सांगितलेल्या ज्ञानाच्या दृष्टीनें तूं मजकडे पहा. स्थूल दृष्टीनें पाहूं नको. कावीळ झाली कीं शुभ्र चांदणेंहि पिवळें दिसूं लागतें. अंगांत ताप असला कीं दूधहि कडू लागतें. तसेंच स्थूल दृष्टीनें पाहूं गेल्यास माझ्या निर्मळ स्वरूपांतहि दोष दिसूं लागतात. स्थूल दृष्टीच्या मूढांना 'आम्हीं परमात्म्याला जाणलें' असें वाटतें खरें; पण तें वाटणेंच खऱ्या ज्ञानाच्या आड येतें. परमात्मा हा परमात्मबुद्धीनेंच जाणायला हवा. मनुष्य-भावनेनें त्याच्याकडे पाहणें हें ज्ञान नसून भ्रम आहे. पाण्यावरचा फेंस प्याल्यानें पाणी प्याल्याचें समाधान लाभणार नाहीं. पण मूढ बुद्धीचे लोक या स्थूलाकारा-लाच परमात्मा मानतात आणि मनुष्याच्या देहधर्मांचा मजवर आरोप करतात. नसलेलीं नामरूपें मला चिकटवतात. नसलेलीं कुळगोत्रें मला जोडतात. मी चराचराच्या अंतर्यामीं समत्वानें भरलेला असूनहि मी कोणाचा तरी कैवार घेतों आणि कोणावर तरी शस्त्र धरतों असें प्रतिपादितात. अशा विपरीत ज्ञानानें पछाडलेल्या तमोगुणी मूढांचें जिणें खरोखर व्यर्थ होय. मातीचे घोडे-स्वार काय कामाचे ? शेराचें झाड कितीहि वाढलें तरी त्याला फळ येत नाहीं. आणि तें इमारतीच्या कामींहि उपयोगी पडत नाहीं. तसें त्यांचें जिणें, त्यांचें ज्ञान आणि त्यांचें कर्महि व्यर्थ होय.

## २९ दैवी प्रकृतीचे पुरुष

पण महात्म्यांची स्थिति याहून निराळी असते. ते दैवी प्रकृतीचा आश्रय करून राहिलेले असतात. ते मला तत्त्वतः जाणतात आणि जाणून अनन्य-भावानें भजतात.

तरी जयाचिये चोखटे मानसीं । मी होउनि असे क्षेत्रसंन्यासी ।
जयां निजेलियांतें उपासी । वैराग्य गा ॥

जयाचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा[1] ।
जयांचे मनीं ओलावा । विवेकाचा ॥

जे ज्ञानगंगे नाहाले। पूर्णता जेऊनि धाले ।
जे शांतीसी आले । पालवें[2] नवे ॥

जे परिणामा[3] निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ ।
जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरिले ॥

जयां भक्तीची येतुली प्राप्ति । जे कैवल्यातें 'परौतें सर' म्हणती ।
जयांचिये लीळेमाजी नीति । जियाली[4] दिसे ॥

जे आघवांचि करणीं[5] । लेइले शांतीचीं लेणीं ।
जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥

—अ० ९ ओ० १८८ ते ९३

त्यांना हरिकीर्तन फार आवडतें. कीर्तनाच्या प्रसंगी भक्त्युद्रेकानें ते नाचूं लागतात. कीर्तनाच्या आनंदांत ते सर्व काल रंगून राहतात. कीर्तनाच्या सुखानें तेच एकटे सुखी होत नाहींत तर सहस्रावधि श्रोत्यांनाहि सुखाच्या डोहांत बुडवतात. सगळें जगच महासुखानें ते दुमदुमवून टाकतात. भूमीवर वैकुंठ आणतात. अशा माझ्या भक्तांना मी कोणाची उपमा देऊं? तेजस्वी म्हणून सूर्य उपमेला आणावा तर त्याचा अस्त होतो. आल्हादक म्हणून चंद्राचें उपमान योजावें तर तो क्षयरोगी. औदार्याबद्दल मेघाशीं तुलना करावी तर तो ओसरून जातो. एवंच ते अतुलनीय आहेत.

लहान, मोठा, राव, रंक, ब्राह्मण, चांडाळ, असला भेदाचा विटाळ त्याना होत नाहीं. ते सर्वांना एकाच पंक्तीला ब्रह्मरसाचें भोजन वाढतात.

---

१. राज्य. २. पालवी. ३. मुक्तीला. ४. सजीव. ५. इंद्रियांनीं.

आपुलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे ।
एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें । नमूंचि आवडे ॥
जैसें उंचीं उदक पडिलें । तें तळवटावरी ये उगेलें ।
तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वभावोचि तयांचा ॥
अखंड अगर्वता होऊनि असती। तयांची विनय हेचि संपत्ति ।
जे जयजय मंत्रें अर्पिती । माझ्या ठायीं ।।
नमितां मानापमान गळाले । म्हणोनि अवचितां मीचि जाहले।
ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥

–अ० ९ ओ० २२३ ते २७

विश्व भिन्न दिसत असलें तरी त्यांचें ज्ञान भिन्न होत नाहीं; तें अखंड असतें. अवयव वेगवेगळे असले तरी देह एकच असतो. लहानथोर अनेक शाखा असल्या तरी मुळांत वृक्ष एकच असतो. त्याप्रमाणें या सगळया नानात्वांत परमात्मा एकच आणि अभिन्न आहे असें तें जाणतात.

नातरी जेववां जिये ठायीं । देखती कां जें जें कांहीं ।
तें मी वांचूनि नाहीं । ऐसाचि बोधु ॥
पाहें पां बुडबुडा जेउता जाये । तेउतें जळचि एक तया आहे ।
मग विरे अथवा राहे । तरी जळाचिमाजी ।।
कां पवनें परमाणु उचलले । ते पृथ्वीपणावेगळे नाहीं केले ।
आणि माघौते जरी पडले । तरी पृथ्वीचिवरी ॥
तैसें भलतेथ भलतेणें भावें । भलतेंहि हो अथवा नोहावें ।
परी तें मी ऐसें आघवें । होऊनि ठेले ॥

–अ० ९ ओ० २५४ ते ५७

१. निमूटपणें. २. जिकडे.

## ३० दीक्षितांचे स्वर्गभोग

या जगाचा मातापिता मीच आहें. सर्वांचा सुहृदहि मीच. निवासस्थानहि मीच. सर्व कांहीं मीच. मजवांचून रिता ठाव या ब्रह्मांडांत कुठेंहि आढळायचा नाहीं. पण या मूढ जीवांचें दैव कसें पहा. त्यांना सर्व कांहीं दिसतें; पण मीच तेवढा दिसत नाहीं. तरंग पाण्यावांचून सुकावे तसे ते माझेच असून मीच नाहीं असें म्हणतात हें आश्चर्य नव्हे का? अमृताच्या डोहांत पडावें आणि 'मी मरतों, मला कोणीतरी वर काढा हो' म्हणून ओरडावें तसा हा प्रकार!

ते सत्कर्मे करतात, तपें आचरतात, यज्ञहि करतात, पण त्या यज्ञांनीं माझी प्राप्ति व्हावी ही इच्छा न धरतां स्वर्ग मिळावा अशी कामना धरतात. स्वर्ग म्हटला कीं त्यांच्या तोंडाला पाणी सुटतें. "स्वर्ग किती सुखमय आहे! तिथें महासिद्धींचीं भांडारें आहेत. अमृताचे डोह आहेत. मंदार, पारिजात-इत्यादि वृक्षांची उपवनें आहेत. कामधेनूंचीं खिल्लारें आहेत. तिथें गंधर्व गायन करतात. अप्सरा नाचतात. अशा त्या स्वर्गात आपल्याला वास्तव्य करायला मिळेल तर किती बहार होईल!" असे त्यांचे मनोरथ चाललेले असतात.

मेल्यानंतर ते स्वर्गाला जातात. तिथलीं सुखें अनुभवतात. पण कुठवर? पुण्य गांठीं आहे तोंवर! तें संपलें कीं त्याच क्षणीं त्यांची मृत्युलोकीं हकालपट्टी होते. स्वर्ग म्हणजे एक प्रकारें कडेलोटच. आधीं चढायचें आणि मग तिथून गडगडत खालीं यायचें! माझे भक्त अशा त्या स्वर्गाकडे ढुंकूनहि पाहत नाहींत. त्यांना मजवांचून दुसऱ्या कशाचीहि अपेक्षा नसते. ते मलाच घट्ट धरून ठेवतात. माझ्यासाठींच जगतात.

## ३१ देवा-भक्तांचें प्रेम

ऐसे अनन्यगतिकें चित्तें। चिंतितसांते मातें।
जे उपासिती तयांतें। मीचि सेवीं॥

ते एकवट्टानि जिये क्षणीं। अनुसरले गा माझिया[1] वाहोणीं।
तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजचि पडली ॥
मग तिहीं जें जें करावें। तें मजचि पडिलें आघवें।
जैसी अजातपक्षाचेनि[2] जीवें। पक्षिणी जिये ॥
आपली तहानभूक नेणे। तान्हया निकें तें माउलीसचि करणें।
तैसे अनुसरले जे प्राणें । तयांचें सर्व मी करीं ॥

—अ० ९ ओ० ३३७ ते ४०

अन्य देवतांची उपासना करणारे भक्त व्यापकत्वानें मला जाणत नाहींत; पण पर्यायानें ते मलाच भजतात. त्यांची ती भजनपद्धति मात्र सरळ नव्हे. सर्व देवांचें मूळ मीच आहें. मला सोडून इतर देवांना भजणें म्हणजे वृक्षाच्या मुळांत पाणी न घालतां तें त्याच्या डहाळ्यांवर घालण्यासारखें आहे. पोटांत गेलेलें अन्न रसरूपानें सर्व इंद्रियांना मिळत असलें तरी खाद्य पदार्थ कांहीं कानांत किंवा डोळ्यांत घालून चालत नाहीं. तो मुखांतच घातला पाहिजे. त्याचप्रमाणें भक्ति करायची ती माझीच केली पाहिजे. आतां माझे भक्त माझ्याशीं कसे एकनिष्ठ असतात व त्यांची भावना कशी असते ती ऐक—

मग मीचि डोळां देखिला। जिहीं कानीं मीच ऐकिला।
मीचि मनीं भाविला। वानिला वाचा ॥
सर्वांगीं सर्वांठायीं। मीचि नमस्कारिला जिहीं।
दानपुण्यादिकें जें कांहीं। तें माझियाचि मोहरां[3] ॥
जिहीं मातेंचि अध्ययन केलें। जे आंतबाहेरी मियांचि धाले।
जयांचें जीवित्व जोडलें। मजचिलागीं ॥

---

१. मार्गाला. २. पंख न फुटलेल्या पिलाच्या. ३. उद्देशानें.

जे अहंकार वाहतु अंगीं । आम्ही हरीचे भूषावेयालागीं[1] ।
जे लोभिये एकचि जगीं । माझेनि लोभें ॥
ते मरणाऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे ।
मग मरणीं आणिकीकडे । जातील केवीं ? ॥

—अ० ९ ओ० ३५९ ते ६५

उपचार म्हणून ज्यांनीं मला आत्मसमर्पण केलें ते माझ्या सायुज्याला प्राप्त होतात. म्हणून अर्जुना, तूं आपल्या मनोमंदिरांत मला विसरूं नको. तूं ज्या क्रिया करशील, जे भोग भोगशील, जीं तपें आचरशील तें सर्व क्रियाजात, माझ्या मोहरेला लाव. अनासक्तीनें सर्व कर्में धुऊन माझ्या हातीं दे.

## ३२ भक्तीचें महाद्वार

माझ्या भक्तीचें महाद्वार सर्वांना मोकळें आहे. तिथें कोणालाहि प्रतिबंध नाहीं. ज्याच्या अंतरांत श्रद्धा आणि प्रेम असेल त्यानें या भक्तिमार्गांत निःशंकपणें यावें ; मग तो ब्राह्मण असो वा चांडाळ असो. दुराचारी माणसें-सुद्धां माझ्या भक्तीनें उद्धरून गेलीं आहेत. माझी भक्ति दुर्जनाला साधु बनवते आणि पतिताला पावन करते. इथें संपत्तीला श्रेष्ठत्व नाहीं. सत्तेला अधिकार नाहीं. पांडित्याचा दिमाख चालत नाहीं. कुळाच्या मोठेपणाला किंमत नाहीं. इथें फक्त एकाच गोष्टीची गरज आहे. शुद्ध भाव ! हा जो धरील तो मला आपलासा करील.

संपत्ति आहे, संतति आहे, विद्वत्ता आहे, पण एक भक्ति नसेल, श्रीहरीचें शुद्ध प्रेम नसेल तर वरच्या साऱ्या गोष्टी व्यर्थ आहेत. तो केवळ पाल्हाळ आहे.

कणेंवीण सोपटें । कणसें लागलीं घनदाटें ।
काय करावें गोमटें । वोस नगर ॥

१. अलंकार.

तैसें सकळ तें वैभव । कुळजातिगौरव ।
जैसें शरीर आहे सावेव । परी जीवचि नाहीं ॥
तैसें माझिये भक्तीविण । जळो तें जियालेपण ।
अगा ! पृथ्वीवरी पाषाण । नसती कायी ? ॥
पैं हिवराची दाट साउली । सज्जनीं जैसी वाळिली ।
तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं । अभक्तातें ॥

–अ० ९ ओ० ४३३ ते ३७

यासाठीं अर्जुना, तूं माझा भक्त हो. माझ्या भजनाच्या ठिकाणीं प्रेम धर. तुझें मन मद्रूपीं ठेव. सगळीकडे माझीं रूपें पहा आणि नमस्कार कर. म्हणजे तूं मलाच प्राप्त होशील. हें माझ्या हृदयींचें गूज मीं तुजपाशीं उघडें केलें आहे. याचा अनुभव घे आणि सुखी हो.

## ३३ ईश्वराचें व्यापकपण

अर्जुना, तुला मीं एवढा वेळ जें कांहीं सांगितलें तें तुझें अवधान पाहण्यासाठीं. तूं नीट लक्ष देऊन ऐकतोस का नाहीं हें मीं त्यांत पाहिलें. पण तूं कसोटीला उतरलास. आतां तूं माझें निजधाम झालास. आतां तुला आणखीहि मी ज्ञानाच्या गोष्टी सांगेन. पेरलेलें शेत उगवलें, त्याला भरघोंस कणसें आलीं कीं शेतकरी दुसऱ्या वर्षी पुनश्च त्या जमिनींत पेरणी करतो. त्याला मग त्या जमिनीची मशागत करतांना कंटाळा येत नाहीं. तुझ्या एकाग्र श्रवणानें मलाहि तसेंच झालें आहे. तुला खूप खूप सांगावेंसें वाटतें. मी बोध करतों तो तुझ्या उपकारासाठीं नव्हे. मी माझ्या सुखस्वार्थासाठीं बोलतों. बालकाला अलंकारांची कल्पना नसते, गरजहि नसते. पण माउली ते त्याच्या अंगावर चढवून स्वतःचे सुखसोहाळे भोगते. असो. आतां पुढें सांगतो तें ऐक.

माझें स्वरूप वेदांनासुद्धां अगम्य आहे. माझ्या तेजापुढें सूर्यचंद्रहि हतप्रभ होतात. समुद्रांत जळचरें विहार करतात, पण तो किती विस्तृत आणि खोल

आहे त्याचा त्यांना थांग लागत नाहीं. त्याप्रमाणें महर्षींचें ज्ञानहि मला ओळखूं शकत नाहीं. पण जे कोणी प्रवृत्तीची वाट सोडून, इंद्रियांना जिंकून आणि देहभाव टाकून पलीकडे जातात त्यांना आत्मप्रकाशानें माझें स्वरूप पाहतां येतें.

याप्रमाणें जो मला जाणील तो दगडांत परिस, रसांत अमृत, तसा मनुष्यांत माझा अंश आहे असें समज. जळत्या चंदनवृक्षाला सर्प जसे सोडून जातात तशीं पापें त्याला भिऊन पळतात. बुद्धि, ज्ञान, असंमोह, इत्यादि भाव मजपासून उत्पन्न झाले आहेत. तसेंच या जीवसृष्टीचे पालक सात महर्षि आणि चार मनु हेहि मींच मनानें उत्पन्न केले आहेत. त्यांनीं मग आठ लोकपाळ उत्पन्न केले. अशा रीतीनें हा सृष्टिविस्तार झालेला आहे. या विश्वांत मजवांचून दुसरें कांहीं नाहीं. अशा प्रकारें मी सर्वव्यापक आहें हें जाणून 'विश्वीं विश्वंभर' ओळखून ज्ञानी पुरुष मला सर्वत्र भजतात. माझ्या भक्तियोगाचें तुला लक्षण सांगतों—

जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥

प्राणिमात्राच्या ठिकाणीं ईश्वरभाव धरणें यालाच खरा भक्तियोग म्हणतात.

## ३४ ज्ञानी-भक्तांची मिळणी

अशा भक्तियोगानें जे अंतर्बाह्य भरले, जे चित्तानें मद्रूप झाले ते सर्वत्र परमात्मसाक्षात्कारानें भुलून जातात आणि जगणें नि मरणेंहि विसरतात. असे ज्ञानी भक्त जेव्हां एकमेकांना भेटतात तेव्हांचा तो महानंद काय वर्णावा! त्यांच्या संवादांत एका आत्मबोधाचेंच देणें-घेणें चालतें.

जैशीं जवळिकेचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें ।
मग तरंगासि धवळारें । तरंगचि होती ॥
तैसी येरयेरांचिये मिळणी । पडत आनंदकल्लोळांची वेणी ।
तेथ बोध बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ॥

जैसें सूर्यें सूर्यातें वोंवाळिलें। कीं चंद्रें चंद्रम्या क्षेम दिधलें।
नातरी सरिसेनि पाडें मीनले। दोन्ही वोघ॥
तैसें प्रयाग होत सामरस्याचें[1]। वरी वोसाण[2] तरत सात्त्विकाचें।
ते संवादचतुष्पथींचे[3]। गणेश जाहले॥
जैसी कमळकळिका जालेपणें[4]। हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे।
दे राया रंका पारणें। आमोदाचें[5]॥
तैसेंचि मातें विश्वीं कथित। कथितेनि तोषें कथूं विसरत।
मग तया विसरामाजि विरत। आंगें जीवें॥

—अ० १० ओ० १२१ ते २७

देव म्हणतो कीं, "अशा भक्तांना मी कांहीं द्यावें असें मनांत आणावें तों त्यांनीं आपल्याला हवें तें आधींच घेतलेलें असतें. त्यांचें तें प्रेमसुख अधिकाधिक वाढावें आणि त्यावर काळाची दृष्टि पडूं नये यासाठीं जपणें एवढेंच माझें काम. भक्त आणि मी अन्योन्याश्रयी आहों. भक्तांना माझी आवड आणि मला त्यांची! माझ्या घरीं साक्षात् लक्ष्मी नांदत असली तरी तेथें प्रेमळ भक्तांची उणीव आहे. म्हणून मला त्यांची अपूर्वाई वाटते. लक्ष्मीलाहि कधीं न दाखविलेलें साजूक सुख मी माझ्या प्रेमळांसाठीं राखून ठेवतों."

यानंतर अर्जुनानें भगवंतास विनविलें आहे कीं, "प्रभो, ज्या विभूतींनीं तूं हें सारें त्रिभुवन व्यापून राहिला आहेस त्या तुझ्या दिव्य विभूति तूं मला कथन कर. त्या एकदां मला कळल्या कीं तुझें चिंतन करायला मला श्रमसायास पडणार नाहींत."

त्यावर देव म्हणाला, किती म्हणून सांगूं? माझ्या विभूतिविस्तारला अंत नाहीं. अंगावरचे केस मोजणें जसें अशक्य तशीच माझ्या विभूतींची गणनाहि अशक्य आहे. पण वानगीदाखल थोड्याशा तुला सांगतों. तूं मग

१. समरसतेचें. २. फेस. ३. चवाठ्यावरचे. ४. पूर्ण फुलल्यावर. ५. सुवासाचें.

शितावरून भाताची परीक्षा कर. आदित्यांत मी विष्णु. नक्षत्रांत मी चंद्र. वेदांमध्यें मी सामवेद. इंद्रियांमध्यें मन. रुद्रांमध्यें शंकर. पर्वतांमध्यें मेरु. महर्षींमध्यें भृगु. सिद्धांमध्यें कपिल मुनि. विद्यांमध्यें अध्यात्मविद्या. वृष्णींमध्यें वासुदेव. पांडवांमध्यें अर्जुन, इत्यादि या माझ्या विभूति होत. विभूति ओळखण्याची एक खूण तुला सांगतों—

जेथ जेथ संपत्ति आणि दया । दोन्ही वसती आलिया ठाया ।
ते ते जाण धनंजया । विभूति माझी ॥

–अ० १० ओ० ३०७

## ३५ रसांचें प्रयाग

ज्ञानेश्वर म्हणतात कीं, आतां अर्जुनाला भगवंताच्या विश्वरूपाची भेट होणार आहे. त्या कथेंत दोन रस आहेत. शांत आणि अद्भुत. शांत हा घरचा यजमान असून अद्भुत हा त्याच्या घरीं पाहुणचार भोगायला आला आहे. आणि या दोघांच्याबरोबर इतर रसांनाहि पंक्तीचा लाभ झाला आहे. लग्नसमारंभांत वधूवरें हीं महत्त्वाचीं असलीं तरी त्यांच्याबरोबरच व्याही-विहीण यांनाहि पागोटीं, लुगडीं मिळतात. वधूवरांच्याबरोबर सगळी वऱ्हाडी मंडळीहि नटून थटून मिरवतात. तसेच इथें मराठी भाषेच्या सुखासनावर सगळे रस मिरवले आहेत.

जेथ शांताचिया घरा । अद्भुत आला पाहुणेरा ।
आणि येरांहि रसां पांतिकरां[1] । जाहला मानु ॥

अहो वधूवरांचिये मिळणीं । जैशीं वऱ्हाडियांही लुगडीं लेणीं ।
तैसे देशियेच्या[2] सुखासनीं । मिरवले रस ॥

परी शांताद्भुत बरवे । जे डोळियांच्या अंजळीं घ्यावे ।
जैसे हरिहर प्रेमभावें । आले खेंवा[3] ॥

१. पंक्तीच्यांना. २. मराठीच्या. ३. आलिंगनाला.

मीनलें गंगायमुनेचें वोघ । तैसें रसां जाहलें प्रयाग ।
म्हणोनि सुस्नात होत जग । आघवें येथ ॥

माजी गीता सरस्वती गुप्त । आणि दोन्ही रस ते ओघ मूर्त ।
यालागीं त्रिवेणी हे उचित । फावेली बापा ॥

—अ० ११ ओ० २ ते ७

ज्याला इच्छा असेल त्यानें सद्भाव धरून या प्रयागांत स्नान करावें आणि प्रयागमाधवाचें विश्वरूप पहावें. एवढ्यानेंच संसाराला तिळोदक दिल्यासारखें होईल.

## ३६ विश्वरूपाचा आविष्कार

अर्जुन म्हणतो, "देवा ! तुझा विभूतियोग मी ऐकला. जगाच्या अणुरेणूंत तूंच भरलेला आहेस. 'एक तूंवांचूनि कांहीं । विश्वीं दुजियाची भाष नाहीं' हे मला समजलें. पण ज्याच्या संकल्पमात्रें ही लोकपरंपरा उत्पन्न होते आणि लयाला जाते, ज्याला तूं आपलें 'परम धाम' म्हणतोस, ज्याला उपनिषदें वाखाणतात, योगी हृदयांत शिरून ज्याचें दर्शन घेतात, सनकादिक जें पोटाळून बसले आहेत आणि जिथून तूं देवकाजासाठीं द्विभुज, चतुर्भुज रूपें घेऊन येतोस तें तुझें मुद्दल स्वरूप—तें अगाध विश्वरूप—डोळाभर पहावें अशी मला उतावळी इच्छा झाली आहे."

अर्जुनानें अशी आळी घेतली तें पाहून भगवंतानें त्याच्यापुढें विश्वरूप प्रकट केलें. त्या विश्वरूपांत त्याला अनंत रूपें दिसूं लागलीं. कांहीं कृश तर कांहीं स्थूल. कांहीं आंखूड तर कांहीं लांब. कांहीं पिंगट तर कांहीं रक्तवर्णी. कांहीं सशस्त्र तर कांहीं अशस्त्र. कांहीं सौम्य तर कांहीं क्रूर. कांहीं हिरवीं तर कांहीं चांपेगौर. अशीं नाना आकारांचीं आणि नाना वर्णांचीं रूपें त्यानें पाहिलीं. आणि नवल हें कीं, प्रत्येक रूपाच्या एकेका अवयवांत अनंत ब्रह्मांडें.

१. प्रसिद्ध झाली.

अर्जुनाची बुद्धि आश्चर्यविमूढ झाली. आपल्यासमोर उभ्या असलेल्या चतुर्भुज रूपाचाच हा अवाढव्य विस्तार हां हां म्हणतां बनला ही त्याला परमाश्चर्याची गोष्ट वाटली. तो म्हणूं लागला--

म्हणे केवढें गगन एथ होतें । तें कवणें नेलें पां केउतें[1] ।
तीं चराचरें महाभूतें । काय जाहलीं ? ॥
दिशांचे ठावही हरपले । अधोर्ध्व काय नेणो जाहलें ।
चेइलियां[2] स्वप्न तैसे गेले । लोकाकार ॥
नाना सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारांगण जैसें लोपे ।
तैसी गिळिली विश्वरूपें । प्रपंचरचना ॥

—अ० ११ ओं० १८८ ते ९०

आश्चर्याचा पहिला भर ओसरल्यावर अर्जुन विश्वरूपाची शोभा पाहूं लागला. चरणांपासून तो मुकुटापर्यंत त्यानें विश्वरूप न्याहाळलें. लावण्य-श्रियेचीं निधानेंच अशीं श्रीहरीचीं मनोहर मुखकमळें त्यानें पाहिलीं कमलवनासारखे सुंदर आणि तेजस्वी नेत्र त्याला दिसले. तो प्रभेचा झळाळ, तें दिव्य तेज, तीं लेणीं, ते शृंगार, विजेच्या लोळांसारखे ते असंख्य भुजदंड आणि प्रत्येक हातांत धारण केलेलीं तीं लखलखीत तिखट शस्त्रें, असा सारा हा विश्वरूपाचा आविर्भाव पाहतांना अर्जुनाच्या दृष्टीची त्रेधा उडाली. अवयवहि तोच आणि अलंकारहि तोच ! हातहि तोच आणि हत्यारेंहि तोच !

ऐसी एकैक शृंगारशोभा । पहातां अर्जुन जातसे क्षोभा ।
तेवींचि देव बैसला कीं उभा । कां शयानु[3] हें नेणवे ॥
बाहेर दिठी उघडोनि पाहे । तंव आघवें मूर्तिमय देखत आहे ।
मग आतां न पाहें म्हणोनि उगा राहे । तरी आंतुही तैसेंचि ॥

१. कुठें. २. जागें झाल्यावर. ३. निजलेला.

अनावर मुखें समोर देखे । तया भेणें पाठिमोरा जंव ठाके ।
तंव तयाहीकडे श्रीमुखें । करचरण तैसेचि ॥
कैसें अनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहणें आणि न पाहणें ।
तयाहीसकट नारायणें । व्यापूनि घेतलें ॥

—अ० ११ ओ० २२६ ते ३०

अर्जुन चमत्कारांच्या महार्णवात पडला. कल्पांतीं बाराहि आदित्यांची मिळणी व्हावी, त्यांतच सगळ्या विद्युल्लता मिळवाव्या, प्रळयाग्नीची सर्व सामग्री तिथेंच आणावी आणि महातेजांचा दशकाहि त्यांतच मिळवावा म्हणजे जें एक असामान्य तेज, जो एक अलौकिक प्रकाश भडकेल त्यालाहि या विश्वरूपप्रकाशाची सर येणार नाहीं असा कांहीं प्रकाश अर्जुनाला दिसला. पाहतां पाहतां तो त्याच्याशीं एकरूप झाला. विश्व वेगळें आणि आपण वेगळा असें अणुमात्र दुजेंपण त्याच्या ठिकाणीं होतें तेंहि एकाएकीं विरून गेलें.

## ३७ अर्जुनाचे अष्ट सात्त्विक भाव

आंतु आनंदा चेईरें[1] जाहलें । बाहेरि गात्राचें बळ हारपोनि गेलें ।
आपाद पां गुंतलें । पुलकांचलें[2] ॥
वार्षिये[3] प्रथम दशे । वोहळलया शैलाचें सर्वांग जैसें ।
विरूढे कोमलांकुरीं तैसे । रोमांच आले ॥
शिवतला चंद्रकरीं । सोमकांतु द्रावो[4] धरी ।
तैसिया स्वेदकणिका[5] शरीरीं । दाटलिया ॥
माजी सांपडलेनि अलिकुळें[6] । जळावरी कमळकळिका जेविं आंदोळे
तेविं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे ॥

१. जागृति. २. रोमांचांनीं. ३. पावसाळयाच्या. ४. द्रवतो.
५. घर्मबिंदु. ६. भ्रमरसमूह.

कर्पूरदेळींचीं[1] गर्भपुटें । उकलतां कापुराचेनि कोंदाटें ।
पुलिका[2] गळती तेवीं थेंबुटे । नेत्रौनि पडती ॥
उदयलेनि सुधाकरें[3] । जैसा भरलाचि समुद्र भरे ।
तैसा वेळोवेळां ऊर्मीभरें । उचंबळत असे ॥
ऐसा सात्त्विकांहीं आठां भावां । परस्परें वर्ततसे हेवा ।
तेथ ब्रह्मानंदाची जीवा । राणीव फावली ॥

–अ० ११ ओ० २४६ ते ५२

तो बसला होता तिथून त्यानें आपलें मस्तक नम्र केलें आणि हात जोडून तो देवाला प्रार्थू लागला—

"देवाधिदेवा ! केवढें हें तुझें विश्वरूप ! ब्रह्मादि देव तुझ्या या रूपांत नांदतात. या रूपाला आदि ना अंत. याची दीप्ति सर्वत्र पसरली आहे. अंतराळ आणि पृथ्वी यांच्यामधलें अंतर तूंच व्यापलें आहेस. हे सारे कौरव, भीष्म-द्रोणांसह तुझ्या पसरलेल्या कराल मुखांत शिरून दाढांखालीं रगडले जातात. जणुं साऱ्या ब्रह्मांडाचा एकच ग्रास करण्यासाठीं तूं आपल्या अनंत जिभा चाटीत आहेस. असा उग्ररूप तूं कोण आहेस तें सांग बरें ! मजवर प्रसन्न हो !"

त्यावर विश्वरूपधारक भगवान् म्हणतो : "अर्जुना, मी काल आहें. सर्व लोकांचा संहार करण्यासाठीं मी वाढलों आहें. तुझ्या साऱ्या शत्रूंना मीं आधींच मारून टाकलें आहे. सारे कौरव आतां केवळ मढीं आहेत. तीं उभीं आहेत त्यांना तूं आडवीं पाड आणि अमर यश मिळव. निमित्ताचा धनी हो !"

भगवंताच्या या भाषणानें अर्जुनाला, आपलें सारथ्य करायला बसलेल्या कृष्णाचें महत्तमत्व कळून आलें. त्याचें अपार सामर्थ्य प्रतीत झालें. अशा विश्वव्यापी व विश्वग्रासी परमात्म्याशीं आपण आजवर फार सलगीनें वागलों, मित्रभावानें त्याची थट्टामस्करी केली, रुसलों, भांडलों याबद्दल अर्जुनाला

१. कापूरकेळीचीं. २. गोळ्या. ३. चंद्र.

पश्चात्ताप झाला. त्यानें बाष्परुद्ध कंठानें देवाची क्षमा मागितली आणि प्रार्थना केली—

"प्रभो ! विश्वरूपदर्शनाचें माझें आर्त पुरलें. आतां हें आवर आणि पूर्वींसारखा कृष्ण हो. मला त्याच रूपाची आवड आहे. तेंच माझ्या नित्य विश्रांतीचें स्थान. आतां त्याच्या दर्शनासाठीं माझे नेत्र आतुर झाले आहेत."

अर्जुनाच्या या बोलण्यानें परमात्मा विस्मित झाला. त्यानें म्हटलें: "अर्जुना, तुझ्यासारखा अविचारी मला तर दुसरा कोणी दिसत नाहीं. हें ज्ञानतेजानें भरलेलें, अनंत, अढळ, विश्वरूप तुझ्यापुढें उभें केलें असतां तूं त्याला सोडून कृष्णरूपाची अपेक्षा धरतोस हें मला नवल वाटतें. बुडायला होईल म्हणून अमृताचा सागर कोणीं नाकारला आहे का? चिंतामणीचें कोणाला ओझें वाटलें आहे का? तूं मात्र तसें केलेंस. आंग सोडून तूं सावलीलाच मिठी मारायला निघालास. असें करूं नको. विश्वरूप दिसायला भयानक असलें तरी त्याचा कंटाळा करूं नको. तिथेंच कृतनिश्चयाचें घर कर. याच्यावरच तुझें प्रेम राहूं दे. बाह्यसुखापुरतें चतुर्भुज रूप ठीक आहे. पण आत्मानंदासाठीं तुला या विश्वरूपींच स्थिर झालें पाहिजे."

असें बोलतां बोलतांच भगवान् विश्वरूप होता तो कृष्णरूप झाला. त्यासरशीं अर्जुनानें सुटकेचा निःश्वास सोडला. तो म्हणाला—"जनार्दना, एवढा वेळ विश्वरूपाच्या महासागरांत हातांनीं पाणी तोडीत होतों तो आतां कृष्णरूपाच्या तीराला लागलों. आतां जिवांत जीव आला."

## ३८ सगुणोपासना सुलभ

त्यानंतर अर्जुनानें देवाला एक मार्मिक प्रश्न विचारला आहे. "भगवन्! मला श्यामसुंदर श्रीकृष्णरूपाचीच संवय जडली आहे; म्हणून मला तेंच आवडतें. पण तूं म्हणतोस कीं, माझ्या अव्यक्त, व्यापक रूपाच्या ठिकाणीं चित्त ठेव. व्यक्त म्हणजे आकाराला आलेलें सगुण कृष्णरूप आणि अव्यक्त म्हणजे निराकार, निर्गुण असें विश्वरूप. तेव्हां व्यक्ताची उपासना करणारे भक्त आणि अव्यक्तोपासक ज्ञानी अथवा योगी यांपैकीं योगवित्तम म्हणजे तुला अधिक जवळचा आणि अधिक आवडता कोण? दोन्ही तुझींच रूपें आहेत असें

माझ्या अनुभवाला आलें आहे. भक्त सगुणाच्या द्वारें तर ज्ञानी अव्यक्ताच्या द्वारें तुझ्या मंदिरांत प्रवेश करतात. सगुण हें एकदेशी आहे असें तूं म्हणशील; पण त्यांत काय बिघडलें? सोन्याची लगड आणि गुंजभर सोनें यांचा कस सारखाच नाहीं का? अथांग सागर आणि चुळकाभर पाणी यांची चव सारखीच. म्हणून माझ्या मतें सगुण-निर्गुण एकच आहे. तेव्हां प्रश्न एवढाच कीं, जे तुझ्यासाठीं सर्व कर्मे करतात, ज्यांनीं आपले मनोधर्म भक्तीला विकले आहेत, जे अंतरींच्या जिव्हाळ्यानें तुझी उपासना करतात, असे तुझे भक्त आणि प्रणवाच्या पलीकडे असलेलें, वैखरीला अनिर्वाच्य आणि अव्यक्त अक्षर असें जें ब्रह्म त्याची सोहंभावानें उपासना करणारे ज्ञानी या दोघांमध्यें तत्त्वतः योग कोणीं जाणला तें मला सांग."

यावर देव उत्तर देतो—

"सकल इंद्रियांसह चित्त मजमध्यें अर्पून रात्र, दिवस न म्हणतां जे माझी उपासना करतात ते माझे भक्तच परम योगयुक्त होत. जे सगुण सोडून निरवयवाला शोधतात असे योगीसुध्दां आपल्या मार्गानें मजकडेच येतात; पण त्यांना भक्तांच्याहून अधिक कांहीं मिळतें असें नाहीं. फक्त कष्ट तेवढे अधिक.

अव्यक्तोपासनेचा मार्ग हा अत्यंत कठिण आहे. तिथें नेहमीं मरणाशीं झुंजावें लागतें. तें पतीवांचून नित्य सती जाणें आहे. डोंगर गिळायची हांव धरली तर तोंड फाटणार नाहीं काय? अव्यक्त मार्ग हा असाच क्लेशप्रद आहे. माझ्या भक्तांना असले कष्ट सोसावे लागत नाहींत. ते सर्व कर्मे मला अर्पण करतात आणि अहंकर्तेपणाचा अभिमान धरीत नाहींत. ते सर्वस्वीं माझे होऊन राहतात.

अशा अनन्य भक्तांच्या कल्याणाची जिम्मेदारी मी स्वतः घेतों. त्यांना कळि-काळाची बाधा होऊं देत नाहीं. त्यांना संसाराचीहि चिंता उरत नाहीं. त्यांच्यासाठींच अनंत रूपांनीं साकार होऊन मी धांवत येतों.

नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं ।
सजूनिया संसारीं । तारूं जाहलों ॥

सडे जे देखिले । ते ध्यानकासे लाविले ।
परिग्रहीही घातले । तरियांवरी ॥

प्रेमाची पेटी । बांधली एकाचिया पोटीं ।
मग आणिले तटीं । सायुज्याचिया ॥

—अ० १२ ओ० ९० ते ९२

अर्जुना, भक्तीचा हा मंत्र तूं शीक. तुझ्या मनबुद्धि माझ्या ठिकाणीं दृढ ठेव. म्हणजे अहंकारहि तिथेंच येऊन बसेल. मग मी-तूंपणाची आपोआप बोळवण होईल. बुद्धीसह चित्त मला अपर्ण करणें हें एकदम शक्य होत नसेल तर त्यासाठीं रोज थोडथोडा अभ्यास कर. त्यांना हळूहळू तशी संवय लाव.

तरी गा ऐसें करीं । यया आठां पहारांमाझारीं ।
मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥

मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख ।
तेतुलें अरोचक । विषयीं घेईल ॥

जैसा शरत्कालु रिगे । आणि सरिता वोहटूं लागे ।
तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनि ॥

—अ० १२ ओ० १०५ ते ७

अर्जुना, अभ्यासानें ज्ञान मिळतें. ज्ञान झाल्यावर मग ध्यान सुलभ होतें. ध्यानाला सर्व मनोवृत्तींनीं मिठी मारली कीं सर्व कर्में एकदम दूर सरतात. मग फलत्याग आपोआप घडतो. त्यागामुळें शांति अंगीं जडते. आणि अशा शांतीनें वरलेला माझा भक्त जनांशीं कसा वागतो आणि त्याचा स्वभाव कसा होतो तें ऐक—

---

१. संसारी. २. प्रहरांत. ३. लहानसें. ४. कंटाळा.

## ३९ एकांतभक्ताचीं लक्षणें

जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेचि कहीं ।
आपपरु नाही । चैतन्या जया ॥
उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ।
हें कांहींच नेणिजे । वसुधा जेवीं ॥
कां रायाचे देह चाळूं । रंका परौतें गाळूं ।
हें न म्हणेचि कृपाळु । प्राणु पैं गा ॥
गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं ।
ऐसें नेणेचि कां करूं । तोयँ जैसें ॥
तैसी आघवियाचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री ।
कृपेशी धात्री । आपण जो ॥

—अ० १२ ओ० १४४ ते ४८

पाऊस पडला नाहीं तरी समुद्र आपला भरलेलाच. तसाच कांहीं मिळो वा न मिळो, हा सदा संतुष्टच. त्याच्या हृदयांत जीव-शिव एकाच आसनावर बसून शोभतात. समुद्र कितीहि खवळला तरी आंतल्या जलचरांना त्याची भीति वाटत नाहीं. आणि जलचरांनीं कितीहि गर्दी केली तरी समुद्र त्यांना कंटाळत नाहीं. तसेंच जग याला उबगत नाहीं आणि हाहि जगाच्या गोंगाटानें संत्रस्त होत नाहीं. जगाएवढा त्याचा आत्मा बनतो. त्याला दुजेपण अणुभरहि उरत नाहीं. म्हणून प्रिय आणि अप्रिय, हर्ष आणि क्रोध हे त्याच्या गांवींच नसतात.

आंतु बाहेरु चोखाळु । सूर्य तैसा निर्मळु ।
आणि तत्त्वार्थींचा पायाळु । देखणा जो ॥

१. पृथ्वी. २. देहांत शिरूं. ३. पाणी.

व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश ।
तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥
संसारव्यथे फिटला । जो नैराश्यें विनटला ।
व्याधाहातोनि सुटला । विहंगु[1] जैसा ॥

—अ० १२ ओ० १७९ ते ८१

आत्मलाभासारखें त्याला दुसरें कांहींच गोमटें वाटत नाहीं. तो सदा भजनशील असतो. शत्रुमित्र त्याला सारखे असतात. तो मानापमान एकाच मापानें मोजतो. आकाशाप्रमाणें त्याला निंदा-स्तुतींचा लेप लागत नाहीं. आल्यागेल्याचा तो शोक करीत नाहीं. सारें जग हें त्याचें विश्रांतिस्थान !

हें विश्वचि माझें घर । ऐसी मति जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥

—अ० १२ ओ० २१३

असा हा माझा भक्त मला अत्यंत आवडतो. त्याला मी माझ्या माथीं मुकुट करतों. त्याची टांच मी हृदयीं वागवतों. त्याच्या गुणांचीं लेणीं मी माझ्या वाणीला घालतों. त्याच्या कीर्तीनें श्रवण भरून घेतों.

तो पहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसी मज डोळे ।
हातींचेनि लीलाकमळें । पुजूं तयातें ॥
दोवरी दोनी । आलों भुजा घेउनी ।
आलिंगावयालागुनी । तयाचें अंग ॥
तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे ।
किंबहुना आवडे । निरुपमु ॥

—अ० १२ ओ० २२३ ते २५

१. पक्षी.

अर्जुना, देवा-भक्तांचें हे अन्योन्य प्रेम, हा साद्यंत भक्तियोग मीं तुला सांगितला. हा भक्तियोग परमरमणीय आहे. सर्वदा सुखावह आहे. ही अमृतधारा आहे. हिचा जो भोक्ता होओील तो मला प्राणाहून प्रिय वाटेल.

## ४० क्षेत्र-क्षेत्रज्ञ

भगवान् म्हणतो—अर्जुना, तुला आतां मी क्षेत्र-क्षेत्रज्ञ विभाग सांगतों. क्षेत्र म्हणजे शेत. हा देह म्हणजे एक प्रकारचें शेतच आहे. शेतांत जशीं पावसाळी, हिंवाळी धान्यें पिकतात तसें इच्छा, द्वेष, सुख, दुःख इत्यादि विकारांचें पीक यां देहरूपी शेतांत पिकतें. हें औट हात लांबीचें आहे. याचा मालक कोण याबद्दल मात्र शास्त्रज्ञांच्या गांवांत तंटा चालू आहे. कर्मवादी लोक या क्षेत्राची मालकी जीवाकडे देतात. सांख्यांच्या मतें अनादि प्रकृति ही याची धनीण. मायावादी म्हणतात कीं, शुद्ध ब्रह्माच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला 'एकोऽहं बहुस्याम्' हा आदिसंकल्प हाच याचा धनी. स्वभाववाद्यांचा कटाक्ष हा कीं, याला कोणी मालकच नाहीं. ज्यानें पिकवावें त्यानें भोगावें. कालवादी आपलेंच घोडें पुढें दामटतात. अशी ही वाटाघाट अनादिकालापासून चालू आहे.

या क्षेत्र-क्षेत्रज्ञांचें ज्ञान त्यालाच ज्ञान म्हणतात. या ज्ञानाच्या प्राप्तीसाठीं योगी देहाची आटणी करतात. तपी तपें आचरतात. यागी यज्ञ करतात आणि उपासक भजनमार्गांत उघड्या अंगानें धांवतात. या ज्ञानाचें महत्त्व काय वर्णावें !

जया ज्ञानाची रिंगवणी[1] । अविद्ये उणें आणी ।
जीवात्मया बुझावणी[2] । मांडूनि दे ॥
जें इंद्रियांचीं द्वारें आडी । प्रवृत्तीचे पाय मोडी ।
जें दैन्यचि फेडी । मानसाचें ॥

१. प्रवेश. २. समझौता.

द्वैताचा दुकाळु पाहे । साम्याचें सुयाणें[1] होये ।
जया ज्ञानाची सोये । ऐसें करी ॥

जें संसारातें उन्मूळी । संकल्पपंक पाखाळी[2] ।
अनावरातें वेंटाळी । ज्ञेयातें जें ॥

जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे ।
जीवु दोंदावरी लोळे । आनंदाचिया ॥

—अ० १३ ओ० १६८ ते ७४

असें हें ज्ञान आहे. हें पवित्रैकनिधान आहे. विटाळलेलें मन इथें चोख करतां येतें. आत्म्याला जीववुद्धीचा जो क्षयरोग लागलेला असतो तो या ज्ञानानें नष्ट होतो. तें बुद्धींत शिरतें व शरिरावर आपला प्रभाव गाजवूं लागतें. तें इंद्रियांच्या व्यापारांत आणि डोळ्यांतहि दिसून येतें.

## ४१ ज्ञान्याचीं लक्षणें

यापुढें भगवंतानें ज्ञान्याचीं लक्षणें सांगितलीं आहेत. ज्ञानाचें लक्षण सांगणें कठीण म्हणून देव ज्ञान्याचीं लक्षणें बोलला. ज्ञानी पुरुषांच्या अंगीं जीं लक्षणें उमटतात त्यावरून ज्ञान म्हणजे काय हें समजून घ्यावें. जें आचरणांत उतरतें तें ज्ञान. वृक्ष-लता टवटवीत दिसूं लागल्या कीं वसंत आल्याची खात्री पटते. तसेंच इंद्रियांच्या व्यापारांवरून ज्ञान कळून येतें. वृक्षांच्या मुळांना भूमिगर्भांत ओलावा मिळाला आहे का नाहीं तें वरच्या फांद्या सांगतात. जमिनींतून वर आलेला कोंभ जोरकसपणें वाढूं लागला कीं खालची जमीन भुसभुशीत आहे हें न सांगतांच कळतें. तसेंच हृदयांत ज्ञान प्रगटलें कीं त्याचीं चिन्हें देहावर दिसूं लागतात. अशीं हीं ज्ञान्याचीं लक्षणें अठरा आहेत.

१. समृद्धि. २. धुऊन काढतें.

ज्ञानी पुरुषाला मानाचें वावडें असतें. कोणी सन्मान केला कीं तो संकोचतो. कोणी गुणवर्णन करूं लागला कीं त्याला अंतरीं गजबज होते.

पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ती कानीं नायकावी ।
हा अमुका ऐशी नोहावी । सेचि[1] लोकां ॥
वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता जरी जोडे ।
परी वेडिवेमाजि दडे । मोहिमेभेणें[2] ॥

—अ० १३ ओ० १८९ ते ९१

तसाच तो दंभरहित होतो. दंभ म्हणजे आपल्या धर्माचें, ज्ञानाचें आणि आचारांचें अवडंबर माजवणें. तें त्याला मुळीच आवडत नाहीं.

खडांणे[3] आला पान्हा । पळवी जेवीं अर्जुना ।
कां लपवी पण्यांगना । वडीलपण ॥
आढ्य[4] आंतुडे[5] आडवीं[6] । मग आढ्यता जेवि हारवी ।
नातरी कुळवधू लपवी । अवेवांतें ॥
नाना कृषीवळु आपुलें । पांघुरवी पेरिलें ।
तैसें झांकी निपजलें । दानपुण्य ॥
वरिवरी देहो न पूजी । लोकांतें न रंजी ।
स्वधर्मु वाग्ध्वजीं । बांधूं नेणें ॥
परोपकारु न बोले । न मिरवी अभ्यासिलें ।
न शके विकूं जोडलें । दानपुण्य ॥

—अ० १३ ओ० २०५ ते ९

१. जाणीव. २. मोटेपणाच्या भीतीनें. ३. खोडकर गाईला. ४. श्रीमंत. ५. सांपडतो. ६. रानांत.

देहानेंच नव्हे तर वाणीनें आणि मनानेंहि तो अहिंसक असतो. बगळा जसा हळुवारपणें पाण्यावरून जातो, भ्रमर जसा कमळावर अलगद् पाय ठेवतो तसा तो आपलीं पावलें कारुण्यांत लपवून चालतो. जिकडे जाईल ती वाट कृपेची करतो. जिकडे पाहील ती दिशा स्नेहभरित करतो. बोलतो तें गोड अन् सहानुभूतीचें बोलतो.

स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार । मुख मोहाचें माहेर ।
माधुर्या जाहले अंकुर । दशन[1] तैसे ॥

पुढां स्नेह पाझरे । माघां चालती अक्षरें ।
शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥

तरी दुवाळी[2] कोणा नोहावी । भंवई कोणाची नुचलावी ।
ऐसा भाव जीवीं । म्हणोनियां ॥

कां नादब्रह्माचि मुसे आलें । गंगापय असललें ।
पतिव्रते आलें । वार्धक्य जैसें ॥

तैसे साच आणि मवाळ । मितले[3] आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥

—अ० १३ ओ० २६२ ते ७०

अगाध सरोवरांत कमलिनी डोलावी तशी त्याच्या अंतरांत क्षमा नांदते. त्याचें मन ऋजु असतें. वाऱ्याच्या गतीसारखे भाव सरळ असतात. कमळ फुललें कीं त्याची पाकळीन् पाकळी उघड होते. तोहि असाच उघड्या मनाचा. त्याच्या मनाला कोनाकोपरा नसतोच मुळीं. 'त्याच्या दृष्टींत मिंधेपणा नसतो, बोलण्यांत संदेह नसतो आणि आचरणांत हीन बुद्धि नसते.

१. दांत. २. दुःख. ३. परिमित.

त्याला सद्गुरुसेवा आवडते. गुरूवर त्याचें अलोट प्रेम असतें. आपलें सर्वस्व तो गुरुकुळीं अर्पण करतो. सद्गुरु आणि आपण यांच्याबद्दल अनेक नाजूक, गोड भावना त्याच्या मनांत खेळत असतात.

एखादिये वेळे । गुरु माय करी भावबळें ।
मग स्तन्यसुखें लोळे । अंकावरी ॥
नातरी गा किरीटी । चैतन्य तरुतळवटीं ।
गुरु धेनु आपण पाठीं । वत्स होय ॥
गुरुकृपास्नेहसलिलीं । आपण होय मासोळी ।
कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥

—अ० १३ ओ० ३९६ ते ९८

गुरूची सगळीच सेवा आपण करावी आणि गुरुकृपा सगळीच्या सगळी मला लाभावी अशी तो हांव धरतो. जिवंतपणींच नव्हे, तर मेल्यावरहि आपल्या देहांतल्या पंचभूतांनीं गुरुगृहाच्या परिसरांतच पडावें अशी त्याची उत्कट इच्छा असते.

कापूर जसा अंतर्बाह्य निर्मळ तसा तो शुचिर्भूत असतो. सदाचरणानें त्याचीं कायिक पापें धुऊन निघतात आणि ज्ञानाच्या उजाळयानें अभ्यंतर निर्मळ होतें. अप्रवृत्तीचीं बीजें त्याच्या मनांत उगवत नाहींत. मनोवृत्ति विकल्पांनीं लिप्त होत नाहीं.

त्याचें अंतःकरण कशाहि परिस्थितींत स्थिर असतें. तें हालत नाहीं कीं डोलत नाहीं.

देह तरी वरिचिलीकडे । आपुलियापरी हिंडे ।
परी बैसका न मोडे । मानसींची ॥
जातया अभ्रासवें । जैसें आकाश न धांवे ।
भ्रमणचक्रीं न भंवे । ध्रुव जैसा ॥

तैसा चळणवळणात्मकीं । असोनि ये पांचभौतिकीं ।
भूतोर्मी एकीं । चाळिजेना ॥

—अ० १३ ओ० ४८६ ते ८९

तो वैराग्याचें घर बनतो. त्याला विषयांची इच्छा सुद्धां होत नाहीं. अहंकाररूपी नागोजीनें त्याच्या हृदयांतून ठाणें उठवलेलें असतें. तो देहांत असतो खरा; पण बिऱ्हाडकरूसारखा. लोकांच्या घोळक्यांत बसणें त्याला आवडत नाहीं. तीर्थक्षेत्रें हिंडावीं, गिरिकपारें वसवावीं, ही त्याची आवड.

हीं लक्षणें जिथें आढळतील तिथें ज्ञान आहे असें समजावें. हें ज्ञान ज्ञेयाची गांठ घालून देतें. ज्ञानाची प्रभा फांकली कीं बुद्धि त्या प्रकाशांत परतत्त्वाला कवळते. ज्ञेय दाखवणें हेंच ज्ञानाचें कार्य. आतां ज्ञेय कशाला म्हणतात तें ऐक. ज्ञेय म्हणजे परमात्म वस्तु. ज्ञेय म्हणजे परब्रह्म! त्याला ज्ञेय एवढ्यासाठीं म्हणायचें कीं, तें ज्ञानावांचून अन्य कोणत्याहि उपायानें साध्य होत नाहीं. ज्ञेयाला जाणणें म्हणजेच ज्ञेयस्वरूप होणें. तसें झालें म्हणजे संसाराची येरझार संपते. तो नित्यानंदाच्या पोटीं विरून जातो. मी नित्यानंद उपभोगतों हें सांगण्यापुरेसाहि तो त्या आनंदाहून निराळा उरत नाहीं.

## ४२ ज्ञेय परब्रह्म

या ज्ञेयाबद्दल 'अस्ति' 'नास्ति' या दोन्ही पक्षीं बोलतां येत नाहीं. तें नाहीं म्हणायला जावें तर विश्वाकारानें प्रतीत होतें आणि विश्वच ज्ञेय म्हणावें तर ती सगळी माया. तिथें रूप—वर्ण—व्यक्ति नाहीं. तिथें द्रष्टृत्व नाहीं आणि दृश्यत्वहि नाहीं. तें सर्वत्र आणि सर्वाकारानें भरलेलें आहे. मातीच्या गाडग्यांत पृथ्वी गाडग्याच्या आकारानें असते. घागरींत घागरीच्या आकाराची आणि परळांत परळाच्या आकाराची. तसेंच हें सर्वगत आहे. विश्वांतल्या लहानमोठ्या सगळ्या क्रिया हे त्याचे हात. म्हणून त्याला 'विश्वबाहु' म्हणतात. एकाच काळीं तें सर्वत्र असतें म्हणून त्याला 'विश्वपाद' म्हणतात. सूर्याला सर्वांगीं डोळे त्याप्रमाणें तें स्वप्रकाशानें जग भासवीत असल्यामुळें त्याला 'विश्वतश्चक्षु'

म्हटलें आहे. सर्वांच्या शिरावर तें नित्य नांदतें म्हणून त्याला 'विश्वमूर्ध' म्हटलें आहे. अग्नीची जी मूर्ति तेंच त्याचें मुख, त्याप्रमाणें तें सर्वपणें सर्वांचा भोग घेतें, म्हणून त्याला 'विश्वतोमुख' अशी संज्ञा आली. वास्तविक पाहतां त्याला ना हात, ना पाय, ना डोळे, ना कान. इतकेंच काय, 'कांहींच नाहीं' हे शब्दसुद्धां त्याला सहन होत नाहींत. एका लाटेच्या पोटीं दुसरी लाट शिरली तर तिथें कोणीं कोणाला गिळलें असें म्हणायचें? कारण गिळणारेंहि पाणी आणि गिळलें जाणारेंहि पाणीच! तद्वत् तें एकच सर्वत्र भरून असल्या-मुळें तिथें व्याप्यव्यापक भेदहि संभवत नाहीं.

तंतु हा वस्त्रामध्यें वस्त्ररूप होऊन असतो. रस हा उदकांत उदकरूप असतो. तेज हें दिव्यामध्यें दीपत्वानें राहतें. तसेंच ज्ञेय सर्वांमध्यें सर्वरूप असतें. नदीचा प्रवाह वळणांनीं वांकडा झाला तरी पाणी वांकडें होत नाहीं. अग्नीचा लोखंडाशीं संपर्क झाला म्हणून तो लोखंड होत नाहीं. तसेंच ज्ञेय हें सत्त्वादि गुण आणि इंद्रियें यांच्यांत सांपडलें आहे असें भासत असलें तरी तें त्यापासून दूर असतें. विकारांमध्यें दिसतें, पण अविकृत असतें. त्याला नामरूपें नाहींत. जाति-क्रिया नाहींत. तें शरिराच्या आंतहि आहे आणि बाहेरहि आहे. जवळहि आहे आणि दूरहि आहे. त्या एकावांचून दुसरें कांहींच नाहीं. प्राणि-मात्रांत तें एकत्वानें आहे. या विश्वरचनेचें आदिकारणहि तेंच आणि आधारहि तेंच. लाटा उत्पन्न होण्याला कारणहि समुद्र आणि आधारहि समुद्रच असतो. तीच स्थिति याची.

## ४३ प्रकृति-पुरुष

अर्जुना, हें एकच ब्रह्म तुला मीं क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ, ज्ञान आणि ज्ञेय, असे चार भाग करून सांगितलें. हेतु हा कीं, तुला स्पष्टपणें उमज पडावा. पण इतकें सांगूनहि तुझी कळी खुललेली दिसत नाहीं. बहुधा तुझ्या चित्तांत जाणिवेचा प्रकाश पडला नसावा. पण तूं चिंता करूं नको. हाच विषय तुला मी निराळ्या एका परिभाषेंत सांगतों. एवढा वेळ आपण चार भाग केले. आतां अवघे दोनच करूं. एक पुरुष आणि दुसरी प्रकृति. हें एक अनादि जोडपें आहे. रूपाबरोबर जशी छाया, तशी ही प्रकृति पुरुषाला सदैव धरून आहे.

मागें तुला क्षेत्र म्हणून जें सांगितलें तीच प्रकृति. आणि क्षेत्रज्ञ सांगितला तोच पुरुष. नांवें वेगवेगळीं, पण लक्षण तेंच. दुसऱ्या शब्दांत सांगायचें तर सत्ता, अधिष्ठान म्हणजे पुरुष आणि त्या सत्तेवर ज्या क्रिया घडतात ती प्रकृति. बुद्धि, इंद्रियें, अंतःकरण आणि त्रिगुण यांच्या मेळाव्याला प्रकृति म्हणतात. सगळीं बरींवाईट कर्में हिच्यापासून निपजतात. आणि त्या कर्मांपासून उत्पन्न होणारीं सुखदुःखें पुरुष उपभोगतो. प्रकृतीनें करायचें आणि पुरुषानें खायचें असा हा विचित्र व्यवहार आहे. आणि सर्वांत मोठें आश्चर्य हें कीं, या दंपतीचा कधींहि संग न होतां प्रकृति चराचर विश्वाला प्रसवते.

या पुरुषाचें पुरुषपण कशा प्रकारचें आहे तें ऐक :—

जे अनंगु तो पंगा[1] । निकवडा[2] निसुगा ।
जीर्णु अतिवृद्धा- । पासोनि वृध्द ॥
तया आडनांव पुरुष । एऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु ।
किंबहुना एकु । निश्चयो नाहीं ॥
अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं ।
कीं भोगणें ऐसयाही । सुखदुःखाचें ॥
तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता ।
परी इया पतिव्रता । भोगविजे ॥

—अ० १३ ओ० ९८१ ते ८५

काय या प्रकृतीचें वर्णन करावें ! ही त्रिगुणांची मूर्ति आहे. प्रतिक्षणीं नित्य नवी. ही जडालाहि माजवते. ही भ्रमाचें महाद्वीप आहे. ही कामाची मांडवी आहे. आकार हिनेंच केले. कला हिच्यापासूनच झाल्या. विद्या हिच्याच बनल्या. इच्छा, ज्ञान आणि क्रिया या अपत्यांना हीच व्याली. अनावर परब्रह्माला हिनेंच वेटाळलें. शून्यांत घर बांधून संसार थाटला. वस्तुतः ज्या

१. लंगडा. २. द्रव्य नसलेला.

परब्रह्माचें कांहींच नाहीं त्याचें सगळें हीच झाली. हिनें अविकृताला विकृत केलें. 'सकलशून्याचा निष्कर्षु' अशा परतत्त्वाला हिनें पुरुपदशेला आणलें. पराधीन राजा आणि रोगजर्जर सिंह हे जसे समर्थ असून दुबळे बनतात तसा हा पुरुष प्रकृतीच्या अधीन झाला कीं आपल्या तेजाला मुकतो. प्रकृतिपरवशतेमुळें त्याला गुणांचा संग धरावा लागतो. आणि या गुणसंगानेंच त्याला अजन्म असून जन्म घेतोसें वाटतें. अमर असून मरतों असा भास होतो. आपण अधमोत्तम योनींतून भ्रमण करीत असल्याचें भासतें. वस्तुतः पुरुषाला यांतलें कांहीं नाहीं.

जुईची वेल कळया-फुलांनीं भारावली म्हणजे ती वाऱ्यानें उन्मळून पडूं नये म्हणून तिच्या मुळांत एक लांकूड पुरतात आणि ती त्याला बांधून ठेवतात. तें लांकूड अथवा ती काठी जुईच्या विस्ताराच्या मध्यभागीं असते खरी; पण जुईच्या सर्व विकारांपासून आलिप्त असते. पुरुप आणि प्रकृति यांच्यांत असाच संबंध आहे. प्रकृतीच्या कार्याचा लेप त्याला लागत नाहीं. प्रकृतिनदीच्या तीरावर हा मेरूप्रमाणें अचल उभा आहे. त्याचें प्रतिबिंब नदींत पडतें, पण प्रवाहांत तो वाहून जात नाहीं. प्रकृति होते, जाते; पण हा कायमच आहे. प्रकृति याच्या जिवानें जगते व याच्या सत्तेवर जग विते, म्हणून याला प्रकृतीचा भर्ता म्हणतात. हा अनादि सृष्टिविस्तार कल्पांतकाळीं याच्या पोटीं लीन होतो. हा ब्रह्मांडाचा सूत्रधार आहे. या देहांत परमात्मा म्हणून जो म्हणतात तो हाच !

या प्रकृति-पुरुषांचा विवेक ज्यांच्या बुद्धीला झाला, हें क्षेत्र-क्षेत्रज्ञांमधलें अंतर ज्ञानदृष्टीनें ज्यांनीं जाणलें ते परतत्त्वाला प्राप्त होतात.

## ४४ ज्ञानेश्वरांची सद्गुरुप्रार्थना

हे सद्गुरुराया! तूं सकल सुरगणांत श्रेष्ठ आहेस. तूं सर्वांचा विसांवा आहेस. तूं आर्तबंधु. तूं कारुण्यसिंधु. माझा हा ग्रंथरूपी व्यवहार फलद्रूप होण्याकरतां तूं सावकार हो. कृपेचें भांडवल मला दे. त्यानें माझ्या बुद्धीची पोतडी भरून टाक. त्या भांडवलावर मग मी गीतार्थाचा धंदा उभारीन आणि संतांना कर्णभूषणें करीन.

हे वाक्सृष्टि एके वेळे । देखतु माझे बुध्दीचे डोळे ।
तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्यबिंबें ॥
माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ ।
तो वसंतु होय स्नेहाळ । शिरोमणि ॥
प्रमेयमहापूरें । हे मतिगंगा ये थोरें ।
तैसा वरिष उदारें । दिठिवेनि ॥
अगा विश्वैकधामा । तुझा प्रसादचंद्रमा ।
करू मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी ॥

–अं० १४ ओ० २० ते २३

ही प्रार्थना ऐकून निवृत्तिनाथ संतुष्ट होऊन म्हणाले, 'ज्ञानेश्वरा! उगीच माझें स्तवन मांडूं नकोस. विषयांतर करून श्रोत्यांच्या उत्कंठेचा भंग करणें बरें नव्हे. तेव्हां मग ज्ञानेश्वरांनीं मूळ विषयाला प्रारंभ केला.

## ४५ त्रिगुणवर्णन

निर्विकार परमात्मा प्रकृतीच्या उपाधींत सांपडल्यामुळें जीवदशेला येतो आणि सुखदुःखें भोगतो. त्रिगुणांच्या दोरीनें ही महामाया आत्म्याला जखडून टाकते. जीवाला बद्ध करणारे हे प्रकृतीचे गुण तीन आहेत. सत्त्व, रज, आणि तम अशीं त्यांचीं नावें आहेत. त्यांपैकीं सत्त्व गुण हा सुख आणि ज्ञान हे दोन फांस जीवमृगाच्याभोंवतीं आवळून त्याला ओढतो. जीव या सत्त्वगुणाच्या कचाट्यांत सांपडला कीं 'मी ज्ञानी, मी सुखी' अशी घमेंड मिरवूं लागतो. अष्ट सात्त्विक भावांनीं ताठून जातो. आपण स्वतःच ज्ञानरूप आहों ही त्याची जाणीव नाहींशी होते. बाह्य ज्ञानानेंच तो फुगतो.

पण हाच सत्त्वगुण जेव्हां वाढतो आणि शुद्ध होतो तेव्हां देहाच्या ठिकाणीं कोणतीं लक्षणें दिसतात तीं ऐक.

१. उगव.

जे प्रज्ञा आंतुलीकडे । न समाती बाहेरी वोसंडे ।
वसंतीं पद्मखंडें । [1]दृती जैशी ॥
सर्वेंद्रियांच्या आंगणीं । विवेक करी रावणी ।
साचाचि करचरणीं । होती डोळे ॥
नायकिणें तें कानाचि वाळी । न पाहणें तें दिठीचि गाळी ।
अवाच्य तें टाळी । जीभाचि गा ॥
वातीपुढां जैसें । पळों लागे काळवसें ।
निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥
धाराधर[2]काळें । महानदी उचंबळे ।
तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥
अगा पुनवेच्या दिवशीं । चंद्रप्रभा धांवे आकाशीं ।
ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंघ[3] ॥

—अ० १४ ओ० २०५ ते १२.

रजोगुण हा जीवाचें रंजन करतो. राजस पुरुषाच्या कामना सदैव जागृत असतात. तृष्णा इतकी प्रबल होते कीं, सोन्याचा मेरु पर्वत जरी हाताला आला तरी संतोष होत नाहीं. तो मोठमोठे उद्योग करतो आणि नाना विषयभोग मिळवतो. परलोकींहि आपल्याला कांही उणें पडूं नये म्हणून इष्टापूर्त कर्में करतो. यज्ञयाग मांडतो. ग्रीष्मांतींच्या वाऱ्याप्रमाणें त्याला विसांवा कसा तो माहीतच नसतो.

तमोगुण हा याहूनहि निकृष्ट आहे. तो व्यवहाराचेहि डोळे मंद करतो. हा अज्ञानानें वाढतो आणि सर्व जगाला अज्ञानांत पाडतो. सर्व इंद्रियांना जाड्य आणतो. यानें मनहि मूढ होतें. आळस ठाणें देतो. काम करण्याची

१. सुवास. २. पावसाळ्यांत. ३. सर्व बाजूंनीं.

हौस उरत नाहीं. स्वस्थ निजून राहावेंसें वाटतें. असें हें त्रिगुणांचें सामान्य स्वरूप आहे.

## ४६ अव्यभिचारी भक्ति

भगवान् बोलला—" अर्जुना, मी दाखवतों म्हणून हे गुण दिसतात. हे माझ्याच सत्तेनें वाढतात. आणि हे नष्ट झाल्यावर बाकी जें शिल्लक उरतें तें माझें शुद्ध स्वरूप. म्हणून मुमुक्षूनें त्रिगुणांच्या पलीकडे गेलें पाहिजे. गुणातीत झालें पाहिजे. आणि गुणातीत होण्याचा एक अत्युत्तम मार्ग म्हणजे माझी अव्यभिचारी भक्ति करणें. विश्वामध्यें विश्वाएवढा अखंड परमात्मा पाहणें हा अव्यभिचार. आणि मी व विश्व यांत भेदभाव धरणें हा व्यभिचार. सूर्य-किरण निराळे दिसत असले तरी ते सूर्यापासून विभक्त नसतात. मी आणि विश्व तसेच आहों. हा ऐक्यबोध, ही सर्वत्र एकात्मतेची दृष्टि हिलाच भक्ति असें म्हणतात.

तेजाचा तेजौनि निघाला । परी तेजींचि असे लागला ।
तया रश्मी ऐसा भला । बोधु होआवा ॥
पैं परमाणु भूतळीं । हिमकणु हिमाचळीं ।
मज़माजी न्यहाळीं । अहं तैसें ॥
हो का तरंगु ल्हानु । परी सिंधूसीं नाही भिन्नु ।
तैसा ईश्वरीं मी आनु । नोहेचि मा ॥
ऐसोनि बा समरसें । दृष्टि जे उल्हासे ।
ते भक्ति पैं ऐसें । आम्ही म्हणों ॥
माझें पैलपण जाये । भक्त हें ऐलपण ठाये ।
अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निवडे ॥
आतां गुणातें तो किरीटी । जिणे या नव्हती गोष्टी ।
जे एकपणाही मिठी । पडों सरली ॥

किंबहुना ऐसी दशा । तें ब्रह्मत्व गा सुदंशा ।
हें तो पावे जो ऐसा । मातें भजे ॥
पुढती इहीं लिंगीं । भक्तु जो माझा जगीं ।
हे ब्रह्मता तयालागीं । पतिव्रता ॥
जैसें गंगेचेनि वोघें । डळमळीत जळ जें निघे ।
सिंधुपद तयाजोगें । आन नाही ॥
तैसा ज्ञानाचिया दिठी । जो मातें सेवी किरीटी ।
तो होय ब्रह्मतेच्या मुकुटीं । चूडारत्न ॥

अ० १४ ओ० ३८४ ते ४००

विश्व हें ज्याला नांव आहे तें सगळेंच्या सगळें अंतर्बाह्य मीच आहें. पातळ तूप थिजून घट्ट झालें म्हणून त्याचे तूपपण नष्ट होत नाहीं. सुवर्णकंकण आटवलें नाहीं तरी तें सोनेंच असतें. तसें विश्वपण न मोडतांच माझें ब्रह्मपण कायम असतें. हें जी जाणील तीच अव्यभिचारी भक्ति. या भक्तीच्या योगानें भक्ताची ब्रह्मतेशीं मिठी पडते. असा भक्त ब्रह्मतेचा मुकुटमणि होतो. सायुज्य मुक्ति किंवा चौथा पुरुषार्थ तो हाच ! विश्वासकट परमात्म्याला ओळखणें हीच ज्ञानभक्ति. हीच सर्वश्रेष्ठ ! हेंच योगाचेंहि सार !

यावांचून मोक्ष नाहीं. शंभर यज्ञ करतो तोच इंद्र होतो. शंभर जन्म ब्रह्मकर्मांत घालवणारालाच ब्रह्मपद मिळतें. त्याप्रमाणें ज्ञानी असेल तोच मुक्त होतो. ज्ञानानेंच मोक्ष हा सिद्धांत आहे. पण हें ज्ञान स्थिर व्हायला हवें. मन शुद्ध झाल्यावांचून ज्ञान मिळत नाही. आणि वैराग्यावांचून ज्ञान टिकत नाहीं. जेवायला बसलेल्या माणसाला आपल्यापुढचें ताट विषमिश्रित आहे असें जर समजलें तर तो तें टाकून उठतो. तसें संसार अनित्य आहे हें एकदां पटलें कीं मग वैराग्य आपोआप येतें आणि ढकलून दिलें तरी जात नाहीं. म्हणून संसाराचें अनित्यत्व पटवून देण्यासाठीं भगवान् रूपकाच्या भाषेनें बोलत आहे.

## ४७ संसार-अश्वत्थवृक्ष

आत्मस्वरूपावर ढगासारखा आड येणारा दृश्याभास म्हणजे हें जगडंबर हाच संसार होय. हा एक मोठा वृक्ष आहे. पण इतर वृक्षांसारखा नव्हे. याच्यावर कुऱ्हाड चालत नाहीं. याला आग लागत नाहीं. हा अवाढव्य पसरला आहे. या जगांत आहे नाहीं तें सगळें याच्या पोटांत आहे. खाऊं म्हटलें तर याला फळ नाहीं. वास घेऊं म्हटलें तर फूल नाहीं. याचें मूळ वर आणि फांद्या खाली आहेत. म्हणून याला ऊर्ध्वमूल म्हणतात. ऊर्ध्व म्हणजे कुठें ? तर परब्रह्मांत.

ज्ञातृज्ञेयाविहीन । नुसधेंचि जें ज्ञान ।
सुखा भरलें गगन । गाळीव जें ॥
जें कार्य ना कारण । जया दुजें ना एकपण ।
आपणयां जें आपण । आपणचि ।
ऐसें जें वस्तु साचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें ।
तेथ आर[१] घेणें मूळाचें । तें ऐसें असे ॥

-अ० १५ ओ० ७७ ते ७९

ज्ञाता आणि ज्ञेय यांच्या विरहित असें जे केवळ ज्ञानमात्र परब्रह्म तें या संसारवृक्षाचें मूळ होय. त्या मुळाला जे अंकुर फुटले तिलाच 'माया' असें म्हणतात. माया ही वस्तुतः आत्मवस्तूच्या ठिकाणीं नाहीं. जागृत मनुष्याला निद्रा यावी आणि तो ज्ञानशून्य व्हावा, किंवा दीपज्योतीवर काजळी धरून ती जशी मंद दिसावी त्याप्रमाणें ही माया आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं भासते आणि आत्म्यालाच स्वतःच्या विसर पाडते. आत्मस्वरूपाची विस्मृति होणें हेंच अज्ञान, आणि अज्ञान हाच या संसारवृक्षाचा कंद. तिथूनच पुढें खालच्या बाजूला याची वाढ होते. पहिलें चिद्वृत्तीचें कोंवळें लुसलुशीत पान फुटतें. पुढें त्रिविध अहंकाराचा तिपानी अंकुर निघतो. त्यालाच पुढें बुद्धि आणि

१. अंकुर.

मन यांच्या फांद्या फुटतात. त्यांना पुढें पंचमहाभूतांचे फोक निघतात. त्यांना इंद्रियें आणि विषय ही पालवी फुटते. स्वर्ग, मृत्यु, पाताळ, या जगांतल्या चौऱ्यायशीं लक्ष योनि, जारज, अंडज, स्वेदज, उद्भिज या चार खाणी, किंबहुना हें चराचर विश्व, एवढा या वृक्षाचा अधोभागीं अफाट विस्तार होतो.

या वृक्षाला ज्ञानी पुरुष 'अश्वत्थ' म्हणतात. अ + श्व + स्थ म्हणजे उद्यांला न राहणारा. अर्थात् क्षणभंगुर.

जैसा न लोटतां क्षणु । मेघु होय नानावर्णु
कां विजु नसे संपूर्णु । निमेषभरी ॥
ना कांपतया पद्मदळा- । वरिलिया बैसका नाही जळा ।
कां चित्त जैसें व्याकुळा । माणसाचें ॥
तैसीच ययाची स्थिति । नासत जाय क्षणक्षणाप्रती ।
म्हणौनि ययातें म्हणती । अश्वत्थु हा ॥

—अ० १५ ओ० ११२ ते १४

पण हा अश्वत्थ असून याला अव्ययहि म्हणतात. अव्यय म्हणजे ज्याला नाश नाहीं, खर्च नाहीं, असा. पण जो अश्वत्थ म्हणजे क्षणभंगुर आहे, तो अव्यय कसा असूं शकेल ? ज्ञानेश्वर सांगतात —

या संसारवृक्षाचे उत्पत्ति-प्रलय द्रुत गतीनें होत असतात. समुद्राच्या पाण्याची एका बाजूनें वाफ होऊन ती अंतराळांत जातच असते म्हणजे त्याचा क्षय चालूच असतो आणि दुसऱ्या बाजूनें नद्यांचे प्रवाह त्याला भरून काढीतच असतात. त्यामुळें समुद्राचा व्यय होत असूनहि तो सर्वदा भरलेला दिसतो. तसाच या संसाराचा एका बाजूनें ऱ्हास होतो व दुसऱ्या बाजूनें तो भरला जातो. आणि हें होणें-जाणें इतक्या वेगानें चालतें कीं, लोकांना त्याचा तर्कहि करतां येत नाहीं. वाळलेली एक फांदी गळून जाते तों तिच्या जागीं बहुसंख्य अंकुर फुटतात. पहिली केव्हां गळाली व दुसऱ्या केव्हां फुटल्या याचा पत्ता लागत नाहीं. वर्षाकालीं आकाशांत ढग किती आले आणि किती गेले याची

कोण गणती करणार? कल्पांतकाळ आला की याच्या सगळ्या आकाररूपी फांद्या गळून जातात आणि कल्पाच्या आरंभीं पुनः नव्या फुटतात.

संहारवातें प्रचंडें । पडती प्रळयांतींचीं सालडें ।
तंव कल्पादीचीं जुंबाडें[1] । पाल्हेजती[2] ॥
रिगे मन्वंतर मनूपुढें । वंशावरी वंशाचे मांडे ।
जैसी इक्षुवृद्धी कांडेनकांडे । जिंके जेवीं ॥
कलियुगांतीं कोरडीं । चहूं युगांचीं सालें सांडी ।
तंव कृतयुगाची पेली देव्हडी[3] । पडे पुढती ॥
वर्ततें वर्ष जाये । तें पुढिला मुळ्हारी[4] होये ।
जैसा दिवसु कीं जात आहे । हें चोजवेना ॥

—अ० १५ ओ० १२७ ते ३०

वारा वाहत असला की त्याची एक झुळूक संपली कुठें व दुसरी लागली कुठून हें समजतें का? तसें एकामागून एक अशीं शरीरें जन्मलीं किती आणि मेलीं किती याची गणती करवत नाहीं. एखाद्या खोल डोहांत पाणी वाहत असूनहि स्थिर आहे असा भास होत नाहीं का?

हा संसारु वृक्ष तैसा । मोडतु मांडतु सहसा ।
न देखोनि लोक पिसा । अव्ययो मानी ॥

—अ० १५ ओ० १३८

अर्जुना, पुनरावृत्तिरहित असें माझें भगवद्धाम हवें असेल तर हा वृक्ष उन्मळून तोडून टाकला पाहिजे. एवढा हा प्रचंड वृक्ष आपल्या हातून कसा तुटेल याची धास्ती तूं धरूं नको. याचें उन्मूलन करायला मुळींच श्रम पडत नाहींत. बागुलबोवाला मारायला कसले कष्ट आले आहेत! संध्याकाळीं पश्चिम

१. वेलींचीं वेंटाळीं. २. पालवतात. ३. नवे अंकुर. ४. आमंत्रण देणारें.

क्षितिजावर उगवलीं जाणारीं गंधर्वनगरें पाडायला सुरुंग का लावावे लागतात? सशाचीं शिंगें मोडावीं का लागतात? मग या लटक्या संसारवृक्षाला तोडायची भीति कसली? हा जर खरा असता तर कोणता मायेचा पूत याला तोडूं शकला असता? अर्जुना, आम्हीं जें हें वृक्ष या रूपानें वर्णन केलें ती सारी माया आहे बरें! वांझेचीं घरभर लेंकरें हीं जितकीं खरीं तितकाच हा भववृक्ष खरा. मूळ अज्ञानच जिथें लटकें तिथें त्याच्यावर आधारलेला हा संसार कितपत खरा असेल? आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळें हा नसलेला संसार बळावला आहे. तेव्हां अर्जुना, ज्ञानरूप खड्गानें तूं याचा छेद कर म्हणजे झालें. ज्ञानावांचून याला तोडण्याचे जे अन्य उपाय तूं करशील ते मात्र सारे अपाय ठरतील. त्यामुळें या वृक्षाच्या पसाऱ्यात तूं अधिक गुंतून पडशील.

या रीतीनें भववृक्षाला छेदून टाकणारे ज्ञानी पुरुष मान-मोह सोडून टाकतात. त्यांची देहाहंता लुप्त होते. त्यांना द्वैताचा दुष्काळ पडतो. सुखदुःखाकारानें प्रतीत होणारीं द्वंद्वें त्यांच्या समोर येण्याला भितात. त्यांना मग माझें पाटाचें निजधाम प्राप्त होतें. त्यांचा पुनरावृत्तीचा मार्ग खुंटतो.

यावर अर्जुनानें आणखी एक महत्त्वाची आशंका विचारली--

पुढती जे तेथ गेले । ते न घेतीचि माघौतीं पाउलें ।
महोदधीं कां मिनले । स्रोतें[1] जैसे ॥
कां लवणाची कुंजरी[2] । सूदलिया लवणसागरीं ।
होयचि ना माघारी । परती जैसी ॥
नाना गेलिया अंतराळा । न येतीचि वन्हिज्वाळा ।
नाही तप्तलोहौनि जळा । निघणें जेवीं ॥
तेवीं मजसीं एकवाट । जे जाले ज्ञानें चोखट ।
तयां पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥

—अ० १५ ओ० ३१७ ते २०

---

१. प्रवाह. २. हत्तीण.

'देवा, ज्ञानी पुरुष निजधामाला प्राप्त झाले कीं मग माघारे फिरत नाहींत असें तूं सांगितलेंस; पण तुझ्या स्वरूपीं मिळण्याच्यापूर्वी ते विभक्त होते का एकरूप होते? जर ते अनादि विभक्त असतील तर तुझ्या स्वरूपीं भिसळणारच नाहींत. फुलांतला मकरंद चाखायला गेलेला भ्रमर कधीं पुष्परूप झाला आहे का? फूल तें फूल आणि भ्रमर तो भ्रमर. बरें, तुझ्यांत आणि ज्ञानवंतांत अनादि ऐक्यच नांदत आहे म्हणशील तर इथें कोणीं कोणाला मिळायचें? अखंड ऐक्यस्थितींत वियोग जसा संभवत नाहीं तसा संयोगहि संभवत नाहीं. मग ज्ञानी पुरुषांना पुनरावृत्ति नाहीं हें सांगण्यांत स्वारस्य तें काय?

## ४८ जीव जगदात्म्याचाच अंश

ही आशंका ऐकून सर्वज्ञशिरोमणि श्रीभगवान् बोलूं लागला––

"पार्था, जीव हे माझ्याशीं भिन्न आहेत का अभिन्न आहेत असा तुझ्या शंकेचा आशय आहे. उत्तर उभयपक्षीं देतां येईल. विचाराच्या दृष्टीनें पाहिल्यास त्यांचें–माझें स्वभावतःच ऐक्य आहे. स्थूलदृष्टीनें पाहूं जातां ते माझ्याहून भिन्न आहेत असेंहि दिसतें. वाऱ्यानें पाणी हाललें की त्यावर उठणाऱ्या लाटा पाण्यापासून वेगळ्या दिसतात; पण वस्तुतः तें सगळें पाणीच नाहीं का? सोन्याचे अलंकार बनवले कीं स्थूलदृष्टीनें ते वेगळे दिसतात, पण विचाराच्या दृष्टीनें अलंकार म्हणजे सोनेंच. तद्वत् ज्ञानदृष्टीनें जीव आणि मी अभिन्न आहों. जें भिन्नत्व दिसतें तें केवळ अज्ञानामुळें. वास्तविक 'भिन्न का अभिन्न' असा प्रश्न उद्भवेल इतकेंसुद्धां द्वैत माझ्या ठिकाणीं नाहीं. मी आविक्रिय, एकरस आहें. माझें स्वरूप शुद्ध आहे; पण तेंच जेव्हां मायोपाधीनें वेढलें जातें तेव्हां माझ्या ठिकाणीं जीव आणि ईश्वर हे भाव उत्पन्न होतात. त्या वेळीं अज्ञानाचा काळोख पसरतो. त्यामुळें 'मी कोण?' असा आत्म्याबद्दलच विकल्प उत्पन्न होतो आणि त्या भरांत 'देहच मी' असा निश्चय होऊन बसतो.

देहाच्या अनुषंगानें राहून देहच मी असें म्हणणारा हा जीव माझाच अंश आहे. जीवरूपानें प्रत्येक शरिरांत मीच वास्तव्य करीत आहें. चंद्राचें पाण्यांत प्रतिबिंब पडावें तसें माझें या संसारांत प्रतिबिंब पडलें आहे. पण लोक वेडे.

तें प्रतिबिंबच खरें असें समजून त्यालाच कवटाळून बसतात. बिंबाकडे पाहतच नाहींत. प्रतिबिंबाला होणारे सगळे विकार हे मलाच आहेत असें धरून चालतात. उपाधीचे गुणधर्म उपहिताला लागू नसतात हें त्यांना कळत नाहीं. कुंकवावर ठेवला कीं स्फटिक तांबडा दिसूं लागतो. पण तें तांबडेपण कुंकूं या उपाधीचें असतें. स्फटिकाच्या शुभ्रत्वांत त्यामुळे कांहींच फरक पडत नाहीं. तद्वत् माझें अक्रियत्व कधींहि खंडित होत नाहीं. पण लोक मला भ्रमानें कर्ता, भोक्ता असें म्हणतात. किंबहुना शुद्ध असा हा आत्मा प्रकृतीशीं संबंध जोडून तिच्या उपाधीनें स्वतःला बाधून घेतो आणि मन व इंद्रियें हीं माझींच आहेत असें म्हणूं लागतो. तो मनाला आपलेंसें करून शब्दादि विषयांचा उपभोग घेऊं लागतो. तो मृत्युलोकीं वा स्वर्गांत नानाप्रकारचीं शरीरें धारण करतो. आणि आत्म्याचें हें देहाशीं तादात्म्य पाहून देहाच्या जन्म-मरणांनीं आत्मा जन्मला आणि मेला असें अज्ञ जनांना वाटूं लागतें. मोहांध प्राणी देहाचे जन्ममृत्यु आत्म्यावर लादतात. ज्ञानी पुरुषांना मात्र आत्म्याचें शुद्धत्व कळतें. ते उपाधीचे म्हणजे देहाचे गुणधर्म आत्म्याला बळेंचळें चिकटवीत नाहींत.

मी सर्वव्यापक आहें. दिवसां जगाचे सर्व व्यापार चालवणारें सूर्यतेज आणि रात्रीं श्रांत जीवांना आल्हाद देणारें चांदणें हीं माझींच तेजें आहेत. अग्नीनेंहि माझ्याकडूनच दाहकत्व मिळवलें आहे. मीच या पृथ्वींत शिरून सर्व भूतांना झेलून धरतों. प्राण्यांच्या शरिरांत राहून अन्न पचवणारा जठराग्नि मीच. सर्वांच्या हृदयांत माझेंच अधिष्ठान आहे."

एवढा वेळ परमात्म्याच्या 'जीव' या सोपाधिक स्वरूपाचें वर्णन ऐकल्यावर अर्जुनाला निरुपाधिक स्वरूपाविषयीं जिज्ञासा सहजच उत्पन्न झाली. भगवंतानें ती जिज्ञासा पूर्ण करायचें ठरवलें. म्हणून क्षर आणि अक्षर या दोन उपाधींचा आधीं प्रपंच करून मग त्यावेगळ्या परमात्म्याचें विशुद्ध स्वरूप सांगावें अशा बेतानें देवानें या विषयाचा प्रारंभ केला.

## ४९ क्षर, अक्षर आणि पुरुषोत्तम

क्षर पुरुष म्हणजे जीव. महत्तत्त्वापासून तों गवताच्या काडीपर्यंत जें कांहीं लहान अथवा थोर, चर अथवा स्थिर, पंचभूतांनीं घडवलेलें, नामरूपांत सांपड-

लेलें, त्रिगुणांच्या टांकसाळींतून निघालेलें असें जें जग तें आपलें वस्तीचें ठिकाण आहे असें मानून वस्तुमात्रांत त्या त्या आकारानें असणारें जें चैतन्य त्याला क्षर पुरुप अशी संज्ञा आहे. ‘ मी काळा, मी गोरा, मी सुखी, मी दुःखी,’ असा हा क्षर पुरुप देहाहंकार धारण करतो. तसेंच देहाच्या संबंधानें जवळ आलेल्या स्त्री-पुत्रांच्या ठिकाणीं ‘ हीं माझीं ’ अशी ममता बाळगतो. त्यामुळें हा भव-स्वर्गाच्या रानांत सदैव भ्रमण करीत राहतो.

दृश्याभास एकीकडे आणि विशुद्ध ब्रह्म दुसरीकडे या दोहोंच्या संधींत असणारा मायोपाधिक ईश्वर तो अक्षर पुरुप होय.

या दोहोंहून वेगळा तो उत्तम पुरुष. विपरीत ज्ञानानें उत्पन्न होणाऱ्या जागृति आणि स्वप्न या दोन अवस्था अज्ञानांत लय पावतात. अज्ञान ज्ञानांत विलीन होतें. ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति करून देऊन ज्ञानहि नष्ट होतें. असा सर्वांचा निरास झाल्यावर जें केवळ ज्ञप्तिमात्र अवशिष्ट उरतें त्याला उत्तम पुरुप म्हणतात. लांकडांत असलेला अग्नि जसा लांकडाहून भिन्न असतो, तद्वत् क्षर आणि अक्षर या दोन्ही उपाधींत असूनहि तो त्याहून वेगळा आहे.

पैं ग्रासूनि आपुली मर्यादा । एक करीत नदीनदां ।
उठी कल्पांतीं उदांवादा[1] । एकार्णवाचा ॥
तैसें स्वप्न ना सुपुप्ति । ना जागराची गोठी आथी ।
जैसी गिळिली दिवोराती । प्रळयतेजें ॥
मग एकपण ना दुजें । असे नाही हें नेणिजे ।
अनुभवु निर्बुजे[2] । बुडाला जेथें ॥
ऐसें आथि जें कांही । तें तो उत्तम पुरुष पाहीं ।
जें परमात्मा इहीं । बोलिजे नामीं ॥

—अ० १५ ओ० ५३३ ते ३६

१. उमाळा. २. लाजतो.

तिथें शब्द काम करीत नाहीं. विचार पुढें पाऊल टाकीत नाहीं. 'अहं ब्रह्माऽस्मि' हा भावहि तिथें नष्ट होतो. द्रष्टयासह दृश्य मावळतें. प्रकाश्य वस्तूवांचून तो प्रकाशक आहे. सत्ता गाजवायला कोणी नसतानांच तो ईश्वर आहे. तो आपल्या स्वरूपांतच आपण असतो. तो नादब्रह्मालाहि ऐकण्याची शक्ति देणारा मूळ नाद आहे. तो स्वादालाहि चव देणारा मूळ स्वाद आहे. तो ब्रह्मानंदालाहि आनंदित करणारा आनंद आहे.

जो पूर्णतेचा परिणामु । पुरुप गा पुरुषोत्तमु ।
विश्रांतिचाहि विश्रामु । विराला जेथें ॥
सुखासी सुख जोडलें । जें तेज तेजासी सांपडलें ।
शून्यही बुडालें । महाशून्यीं जिये ॥
जो विकासाहीवरी उरता । ग्रासातेंही ग्रासूनि पुरता ।
जो बहुतेंपाडें बहुतां-। पासूनि बहु ॥

—अ० १५ ओ० ५४८ ते ५०

विश्व न होतांच त्यानें त्याला झेललें आहे. एवढें ब्रह्मांड निपजलें म्हणून तो निपजला नाहीं. ब्रह्मांडाचा लोप झाला म्हणून तो कुठें गेला नाहीं. 'एकटा ठायींचा ठायीं एक' अशी त्याची स्थिति आहे. त्याची उपमा त्यालाच.

या पुरुषोत्तमाला ज्यानें जाणलें तो सर्वज्ञ झाला. आणि तोच सर्वभावें मला भजला. गगनानेंच गगनाला खेंव द्यावी. क्षीरसागरानेंच क्षीरसागराला मेजवानी करावी. अमृतानेंच अमृतांत मिसळावें. इतरांची ती योग्यता नाहीं. तसेंच जो मद्रूप झाला त्यालाच माझी भक्ति करतां येईल. 'शिवो भूत्वा शिवं यजेत्!'

## ५० दैवी आणि आसुरी संपत्ति

अशा प्रकारें देवानें अर्जुनाला चोखडें आत्मतत्त्व विशद करून सांगितलें. ज्ञानाचा कंदच त्याच्या हातीं आला. ही सगळी ज्ञानकथा ऐकून अर्जुनाला

वाटलें कीं, ज्ञानप्राप्तीच्या बाबतींत तपशिलाच्या कांहीं गोष्टी देवाला विचाराव्या. अपरोक्ष ज्ञान कसें प्राप्त होईल? प्राप्त झाल्यानंतर तें टिकेल कसें? ज्ञानाला विघ्न करणाऱ्या गोष्टी कोणत्या? इत्यादि अर्जुनाच्या प्रश्नांना उत्तर देतांना देवानें दैवी आणि आसुरी संपत्तीचें वर्णन आरंभलें.

"हे किरीटी! दैवी संपत्ति ही ज्ञानाला अनुकूल आहे. ती मुमुक्षूला मोक्ष-मार्गांत सोबत करते. ही मोहरूप रात्रींत धर्माची मशाल आहे. सर्व दैवी गुणां-तला प्रमुख गुण 'अभय' हा आहे. हा 'धुरेचा बैसणा' आहे. भय हें अत्यंत घातुक. अहंकर्तेपणा टाकून या भयाचा निरास करावा. कोणतेंहि कर्म जो निर-हंकार वृत्तीनें करतो त्याला संसाराचें भय उरत नाहीं. अद्वैतभावाचा विस्तार होऊन सर्व जग आत्मस्वरूप दिसूं लागलें कीं भयाचा मागमूसहि उरत नाहीं. हें अभय मुमुक्षूची पाठ राखतें.

सत्त्वसंशुद्धि म्हणजे बुद्धि निर्मळ होणें. वर्षाऋतूला प्रारंभ होण्यापूर्वीं गंगेचें पाणी कसें स्वच्छ असतें! त्याप्रमाणें संकल्प-विकल्प जाळून रज–तमांची झाडी झाली आणि बुद्धीला स्वरूपाचें ध्यान करण्याची आवड उत्पन्न झाली कीं सत्त्वसंशुद्धि झाली असें समजावें.

आतां दानाचें लक्षण ऐक—

आतां देहवाचाचित्तें। यथासंपन्नें वित्तें।
वैरी जालियाही आर्तातें। न वंचणें जें कां॥

पत्र पुष्प छाया। फळ मूळ धनंजया।
वाटेचा न चुके आलिया। वृक्षु जैसा॥

तैसें मनौनि धनधान्यवरी। विद्यमानें आल्या अवसरीं।
श्रांतांचिये मनोहारीं। उपेगा जाणें॥

—अ० १६ ओ० ८५ ते ८७

अधिकारपरत्वें आपल्या भागा आलेलीं कर्में यथाविधि करीत राहणें आणि त्यांत फलाशेचें विष न मिसळणें याला यज्ञ म्हणतात. धूप आगींत उडी

घालतो; पण घरादाराला सुगंधाची लयलूट करतो. सोनें आगींत जळून वजन कमी करून घेतें, पण कस वाढवतें.

तैसा स्वरूपाचिया प्रसरा[1]— । लागीं प्राणेंद्रियशरीरां ।
आटणी करणें जें वीरा ! । तेंचि तप ॥

—अ० १६ ओ० १०८

केवळ कायक्लेश, पंचाग्निसाधन, एका पायावर वारा वा जल पिऊन राहणें म्हणजे तप नव्हे. या सर्व गोष्टी आत्मलाभाच्या ध्येयानुसार व्हाव्या लागतात, तेव्हांच त्यांना तपःस्वरूप येतें.

आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीर वाचा मानसें ।
राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥

—अ० १६ ओ० ११४

जगाचें बरें व्हावें, जगाला सुख लाभावें या उद्देशानें शरीर, वाणी आणि मन यांना चंदनाप्रमाणें झिजवीत राहणें, त्या हेतूनें सर्व क्रिया करणें याला अहिंसा असें म्हणावें. आतां सत्याचें स्वरूप ऐक. सत्य हें तीक्ष्ण असूनहि मऊ असतें. जसें पाणी. बुबुळावर घासलें तरी पाणी खुपत नाहीं आणि त्याच्या संतत धारेखालीं मोठमोठे खडकहि दुभंग होतात. तद्वत् संशयनिवृत्ति करण्यांत सत्य हें भाल्यासारखें तीक्ष्ण असतें. आणि आनंद देण्यांत साक्षात् माधुर्यालाहि लाजवतें. त्याचा परिणाम फार मधुर असतो.

आतां त्यागाचें लक्षण ऐक—

आतां मृत्तिकात्यागें घट्ट । तंतुत्यागें पट्ट ।
त्यजिजे जेवीं वट्ट । बीजत्यागें ॥
तेवीं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडून पाहीं ।
सांडिजे अशेषही । संसारजात ॥

—अ० १६ ओ० १३१ ते ३४

---

१. विकास.

ज्ञानी पुरुष देहाभिमानाचा त्याग करतात आणि त्यामुळें देहाहंतेवर आधारलेल्या संसाराचा त्याग न करतांच होतो. हाच खरा त्याग. संसारांतून उठून जाणें हा त्याग नव्हे." यानंतर देव अर्जुनाला शांतीचें लक्षण सांगतो.

"ज्ञानी पुरुषानें परमात्मवस्तु जाणल्यावर ज्ञाता आणि ज्ञान हीं निःशेष हरपून जाणें अशी जी अवस्था प्राप्त होते. तिला शांति म्हणतात.

जैसा प्रळयांबूचा उभेडु[1] । बुडवूनि विश्वाचा पवाडु[2] ।
होय आपणपें निबिडु । आपणचि ॥
मग उगम ओघ सिंधु । हा नुरेचि व्यवहारभेदु ।
परी जळैक्याचा बोधु । तोहि कवणा ! ॥
तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं ।
मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप ॥

अ० १६ ओ० १३८ ते ४०

अर्जुना! ही झाली दैवी संपत्ति. याच्या उलट दांभिकपणा, उन्मत्तपणा, नास्तिक्य, अभिमान, क्रोध, कठोरपणा आणि अज्ञान हे आसुरी संपत्तीचे (अव) गुण होत. आसुरी संपत्तीचे प्राणी अधोगतीला जातात. काम, क्रोध आणि लोभ हे जोंवर सुटले नाहींत तोंवर नरकाची वाट चुकत नाहीं. हे तीन म्हणजे नरकाचीं तीन द्वारेंच होत. अर्जुना, तूं यांचा समूळ त्याग कर. या तिघांची पकड ढिली झाली नाहीं तोंवर कोणाच्याहि हातून विधिनिषेध पाळले जाणार नाहींत. शास्त्रमर्यादा राखल्या जाणार नाहींत. कार्य कोणतें आणि अकार्य कोणतें तें आपल्या मनानें ठरवून चालत नाहीं. शास्त्राच्या डोळ्यांनीं तें पाहावें लागतें. कर्माकर्मनिर्णयाच्या कामीं शास्त्र हेंच प्रमाण होय. पार्था, तूंहि शास्त्रविहित अशींच कर्में कर."

## ५१ तीन प्रकारची श्रद्धा

शास्त्रज्ञान नसलें आणि केवळ श्रद्धेच्या जोरावर कर्में करीत राहिलों तर तीं

१. महापूर. २. पसारा.

मोक्षाला कारणीभूत होणार नाहींत का? या अर्जुनाच्या प्रश्नाला उत्तर देतांना श्रीहरि म्हणतो—

"पार्था! श्रद्धेनें मोक्ष मिळवणें वाटतें तितकें सोपें नाहीं. केवळ श्रद्धेवर विश्वास टाकतां कामा नये. ती सगळ्याच काळीं निर्दोष नसते. गंगा ही पवित्र खरी; पण ती मद्यपात्रांत ओतल्यास तिचें पावित्र्य नष्ट होतें. चंदन शीतल खरा; पण अग्नीशीं संपर्क झाल्यावर तोच हाताला चटका देतो. तसेंच श्रद्धेचें आहे. ती जरी मूलतः शुद्ध असली तरी प्राण्यांच्या वांटणीला येतांना प्रकृतीच्या तीन गुणांपैकीं कोणताना कोणता तरी गुण तिला चिकटून येतो. एकच श्रद्धा त्रिगुणांच्या अनुरोधानें त्रिविध बनते. त्यांपैकीं सात्त्विक श्रद्धा तेवढी मोक्ष-फळापर्यंत जाऊं शकते. राजस श्रद्धा कर्मांतच गुंतवते आणि तामस श्रद्धा कसलेहि भोग भोगण्यास उद्युक्त होते. गुणांच्या संगतीनें तिची पूजास्थानेंहि बदलतात. श्रद्धाच जर घ्यायची तर ती सात्त्विक घ्यावी. सात्त्विक श्रद्धावंतांना मोक्षाचा मोठासा बाऊ वाटत नाहीं. श्रद्धेनें चित्त शुद्ध होतें. चित्तशुद्धीनंतर ज्ञान मिळतें. आणि ज्ञानानें मोक्ष ठेवलेलाच. म्हणून सात्त्विक श्रद्धा नेहमीं जोपासावी. त्यासाठीं सत्पुरुषांचा सहवास करावा. तिला पोषक असाच आहार करावा.

श्रद्धेप्रमाणेंच यज्ञहि तीन प्रकारचा होतो. त्यांत सात्त्विक यज्ञ श्रेष्ठ होय.

पातलेया झाडाचें मूळ। मागुतें सरों नेणेचि जळ।
जिरालें का केवळ। तयाच्याचि अंगीं॥
तैसें मनें देहीं। यजननिश्चयाच्या ठायीं।
हारपोनि जे कांहीं। वांच्छितीना॥
तिहीं फलवांच्छात्यागीं। स्वधर्मावांचूनि विरागीं।
कीजे जो यज्ञु सर्वांगीं। अळंकृतु॥

—अ० १७ ओ० १७४ ते ७६

फलाशा सोडून व स्वधर्मावांचून इतर गोष्टींविषयीं विरक्त होऊन सर्वांग-परिपूर्ण असा जो यज्ञ केला जातो तो सात्त्विक होय. स्वर्गादि फलांची आशा धरून केलेला यज्ञ राजस व विधिहीन आणि मंत्रहीन यज्ञ तामस समजावा.

## ५२ त्रिविध तप

तपहि तीन प्रकारचें आहे. शारीर, वाङ्मय आणि मानस. देवदर्शन होतांच साष्टांग नमस्कार घालणें, देवाचें आंगण झाडणें, पूजासाहित्य करणें—

आणि विधि–विनयादिकीं । गुणीं वडील जे लोकीं ।
तया ब्राह्मणांची निकी । पाइकी कीजे ॥
सकलतीर्थांचिये धुरे । जियें कां मातापितरें ।
तयां सेवेसि कीर शरीरें । लोण कीजे ॥
आणि संसाराऐसा दारुणु । जो भेटलाचि हरी शीणु ।
तो ज्ञानदानीं सकरुणु । भजिजे गुरु ॥

अ० १७ ओ०२०५ ते ८

याला कायिक तप म्हणतात. लोखंडाचें वजन आणि आकार यांत अणुमात्र कमीपणा न आणतां परीस त्याचें सोनें करतो. त्याचप्रमाणें दुसऱ्यास यत्किंचितहि दुःख न देतां केवळ सुखच देणें व वेदांचें पठण अथवा नामस्मरण करणें याला वाङ्मय तप म्हणतात. संकल्प-विकल्प नष्ट होऊन मनाचें आत्मस्वरूपीं स्थिर राहणें याला मानस तप म्हणतात.

अशीं हीं तीनहि प्रकारचीं तपें, पूर्ण श्रद्धेनें आणि फळाशा सोडून आचरल्यास तीं सात्त्विक होतात. जगाकडून स्तुतिस्तोत्रें गाऊन घेण्यासाठीं आचरलेलीं तपें राजस व शाप देण्याचें सामर्थ्य यावें म्हणून केलेलीं तपें हीं तामस होत.

दानहि तीन प्रकारचें आहे. पर्वकाळीं, पुण्यक्षेत्रीं व परतफेडीची अपेक्षा न बाळगतां केलेलें दान सात्त्विक होय. प्रत्युपकाराचा हेतु मनांत ठेवून अथवा मोठेपणा मिळविण्याची हांव धरून मोठ्या कष्टानें दिलेलें दान राजस समजावें. आणि देशकालपात्राची विचारणा न करतां याचकाला हिडीसफिडीस करून दिलेलें दान तामस समजावें.

अर्जुना, श्रद्धेपासून दानापर्यंत या साऱ्या क्रिया सत्त्वादि गुणांनीं त्रिविध होतात. यांतले सात्त्विक प्रकार घेण्यासाठीं व राजस-तामस प्रकार टाकण्यासाठीं म्हणून मीं तुला कथन केले आहेत.

तात्पर्य, श्रद्धा हवी; पण ती सात्त्विक असावी. राजस, तामस नको. श्रद्धेनें केलेलें कर्म हें सत्कर्म होतें. श्रद्धा नसेल तर सारीं यज्ञ-दान-पुण्यें निष्फळ होत. खडकावर पडलेला पाऊस व्यर्थ जातो. राखेच्या ढिगांत केलेलें हवन निरुपयोगी ठरतें. पैसा म्हणून खापरी गांठीला बांधली तर ती आपल्या देशांत तशीच परदेशांतहि चालत नाहीं. तसें श्रद्धाहीन कर्म इहलोकीं आणि परलोकींहि निरर्थक होय."

यानंतर अर्जुनानें संन्यास कशाला म्हणावें आणि त्याग कशाला म्हणावें असा भगवंताला प्रश्न केला तेव्हां त्यानें त्याचें उत्तर दिलें तें असें:—

## ५३ त्याग आणि संन्यास

"काम्य कर्मांचा स्वरूपतः त्याग करणें याला संन्यास म्हणतात. काम्य कर्मे म्हणजे स्वर्गादि कामना मनांत धरून केलीं जाणारीं कर्मे. हीं कर्मे फल उत्पन्न करतात आणि जिवाला भोगवण्यासाठीं देहाच्या दारांत धरणें धरून बसतात. ऋण जसें फेडल्यावांचून संपत नाहीं, त्याप्रमाणें काम्य कर्मे फलभोग दिल्यावांचून दूर होत नाहींत. यासाठीं मुळांतच त्यांना स्पर्श करूं नये. विष जसें ओकून टाकतात तशीं हीं टाकावीं. काम्य कर्मे टाकलीं म्हणून नित्य-नैमित्तिक कर्मे मात्र टाकूं नयेत. तीं यथाविधि आचरावीं. त्यांच्या ठिकाणींहि फळ आहेच. पण तें आपण घेऊं नये. वसंत ऋतु उद्यानांत प्रगट होतो व तिथल्या वृक्षवल्लींना फळांफुलांचा बहर आणतो. पण त्यांतल्या एकाहि फळाफुलाला हात न लावतां तो आला तसा निघून जातो. तशींच ज्ञात्यानें नित्य-नैमित्तिक कर्मांची फलें टाकावी. या फलत्यागाला त्याग असें म्हणतात. फलाचा त्याग करण्यापेक्षां कर्मांचाच त्याग करणें बरें, असें कोणी म्हणेल. पण तें बरोबर नाहीं. स्वभावजन्य कर्मांचा कोणालाहि त्याग करतां येणार नाहीं. जोंवर देह आहे तोंवर कर्मे कोणालाहि चुकलेलीं नाहींत. म्हणून कोणींहि कर्मांचा कंटाळा धरतां कामा नये. गाडग्याला मातीचा वीट धरून कसें चालेल!

वस्त्राला तंतूचा कंटाळा करून वस्त्रपणानें राहतां येईल का? दिवा ज्योतीचा तिरस्कार करील तर त्याचा कोण आदर करणार? तसा शरिराच्या अवस्थेंत जीव जोंपर्यंत नांदत आहे तोंपर्यंत कर्मत्याग करूं म्हणणें हें वेडेपण आहे. कर्माच्या ठिकाणीं बंध आहे हें खरें; पण तो कशामुळें आहे तें पाहिलें पाहिजे व तेंच नेमकें टाकलें पाहिजे.

तैसा कर्तृत्वाचा मदु। आणि कर्मफळाचा आस्वादु।
या दोहींचें नांव बंधु। कर्माचा कीं॥

–अ० १८ ओ० २०५

'हें कर्म मीं केलें' असा कर्तृत्वाचा अहंकार आणि 'माझ्या कर्माचें फळ मी चाखीन' असा अभिलाष या दोहोंचें नांव बंध असें आहे. हीं दोन्ही टाकलीं कीं कर्म निर्जीव झालें. मग तें जीवाला बद्ध करूं शकत नाहीं.

सांवळया अंगाला चंदनाची उटी विशेषच खुलते. प्रमदांच्या नेत्रांना काजळ अधिकच शोभतें. त्याप्रमाणें नित्य कर्माचें आचरण मनुष्यमात्राला विभूषित करतें. ज्ञानी पुरुष भागा आलेलीं कर्में फलाची अपेक्षा न धरतांहि तत्परतेनें करतो आणि तीं ब्रह्मार्पण करून मोकळा होतो. कर्म आचरीत असतां अवचित प्रत्यवाय आला आणि तें थांबलें तरी तो खेद करीत नाहीं. तसाच आरंभलेलें शेवटास गेलें म्हणून गर्वानें फुगत नाहीं.

विहित कर्माचें आचरण ही भगवत्सेवाच आहे. विहित कर्म करणें म्हणजे भगवंताचें मनोगत जाणणें असा त्याचा अर्थ आहे. कर्मरूपी सेवा देवाला फार आवडते. गुलाब आणि चंपक यांच्या फुलांपेक्षां कर्मकुसुमें त्याला अपार संतोष देतात.

तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमांची वीरा।
पूजा केली होय अपारा। तोषालागीं॥
म्हणौनि तिये पूजे। रिझलेनि आत्मराजें।
वैराग्यसिद्धि देइजे। पसाय तया॥

जिये वैराग्यदशे । ओीश्वराचेनि वेधवशें ।
हें सर्वही नावडे जैसें । वांतै होय ॥
म्हणौनि मोक्षलाभालागीं । जो व्रतें वाहतसे अंगीं ।
तेणें स्वधर्मु आस्था चांगी । अनुष्ठावा ॥

अ० १८ ओ० ९१७ ते २२

आपला स्वधर्म आचरायला कठीण आणि परधर्म सुलभ वाटला तरी स्वधर्माचा त्याग करून परधर्म स्वीकारूं नये. आपलें असेल तेंच आपल्याला उपयोगीं पडतें. तेंच संकटांतून तारतें. मग तें कितीहि कठीण वा हेंगाडें असो. कुरूप असली तरी आईच आपलें प्रेमानें संगोपन करील. आपल्यासाठीं खस्ता खाओील. अितर स्त्रिया रंभेसारख्या सुंदर असल्या तरी बालकाच्या दृष्टीनें त्या कुचकामाच्या आहेत. पाण्यापेक्षां तूप कितीतरी पटींनीं मूल्यवान् आणि पौष्टिक असतें. पण मासा तुपांत जगूं शकणार नाहीं. कारण तें त्याला परकें आहे.

वरकरणीं दुसऱ्याचा धर्म कितीहि सुलभ आणि सुंदर दिसला तरी वस्तुतः तो तसा नसतो. अनुभवांतीं तोहि आपल्याइतकाच कठीण आहे हें कळून येतें. असें जर आहे तर स्वधर्म कां टाकावा? कुठेंहि जर श्रमसायास सारखेच तर मग स्वधर्मातच ते सोसलेले बरे नाहीं का? राजरस्त्यानें जाणें आणि आडवाटेनें जाणें या दोहोंतहि कष्ट सारखेच असतील तर सरळ मार्गानें चालणेंच बरें. दगडाचें आणि शिदोरीचें ओझें सारखेंच असेल तर प्रवासाला जातांना शिदोरीच उचलणें उपयुक्ततेच्या दृष्टीनें योग्य ठरेल. त्याचप्रमाणें स्वधर्म का परधर्म असा विकल्प उत्पन्न झाला असतां परधर्माचा मोह झुगारून देऊन स्वधर्माचाच मार्ग चोखाळावा. तोच आपल्या सर्व श्रमांचा शेवटीं परिहार करील आणि आपल्याला परम पुरुषार्थाची जोड करून देईल."

यानंतर भगवान् आपल्या लाडक्या भक्ताला परा भक्ति म्हणजे काय वस्तु आहे व ती कोणाला आणि कशी प्राप्त होते तें सांगत आहे—

१. वमन.

# ५४ परा भक्ति

" अहंकार आणि कामक्रोध यांना टाकून जो निर्भय झाला त्याला ब्रह्मभाव-योग्यता प्राप्त होते. मग तो आत्मबोधाच्या राजपदावर आरूढ होतो. शरदृऋतु सुरू झाला कीं गंगेची खळबळ थांबून ती संथपणें वाहूं लागते. त्याप्रमाणेंच आत्मबोध झाल्यावर सारी लगबग संपते आणि ज्ञानासाठीं केलेल्या सगळ्या श्रमांचा परिहार होतो. एक प्रकारचें आनंदमय स्थैर्य लाभतें. या स्थितीला आत्मज्ञानाची प्रसन्नता असें म्हणतात. त्या वेळीं ऐक्यभावाचें भरतें येतें. कशा-बद्दल तरी शोक करावा किंवा कशाची तरी इच्छा धरावी या गोष्टी आपोआप थांबतात. सूर्योदय झाल्यावर नक्षत्रांचें तेज हारपतें त्याप्रमाणें आत्मसूर्याच्या उदयकालीं भेदभाव लुप्त होऊन अभेददृष्टीचा प्रकाशच प्रकाश होऊन जातो. पाटीवरचीं अक्षरें सहज पुसून टाकावीं त्याप्रमाणें द्वैत आपोआप अदृश्य होतें. जागृति आणि स्वप्न या दोन्ही अवस्थांतलीं विपरीत ज्ञानें अज्ञानांत लीन होतात. हळूहळू मग अज्ञानालाहि क्षयरोग लागतो आणि पूर्णबोधाच्या वेळीं तें मरून जातें. कल्पांतकाळीं सर्व सृष्टि जलमय झाल्यावर हा समुद्र, या नद्या, हे वहाळ, ओहळ, हे भेद मोडून आब्रह्मस्तंबपर्यंत पाणीच पाणी होऊन जातें. घट, परळ, या उपाधि नाहींशा झाल्या कीं, एकटें महाकाशच शिल्लक उरतें. त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाला एका मजवांचून स्वतःपुरतासुद्धां भेद उरत नाहीं. या स्थितीलाच ज्ञानभक्ति असें म्हणतात. 'पैं माझिये सहजास्थिती। भक्तिनाम।"

या ज्ञानभक्ति सहज। भक्त अेकवटला मज।
तो मीचि केवळ हें तुज। श्रुतही आहे॥

जे उभऊनियां भुजा। ज्ञानिया आत्मा माझा।
हें बोललों कपिध्वजा। सप्तमाध्यायीं॥

हे कल्पादीं भक्ति मियां। भागवतामिषें ब्रह्मया।
उत्तम म्हणूनि धनंजया। उपदेशिली॥

ज्ञानी इयेतें स्वसंवित्ति । शैव म्हणती शक्ति ।
आम्ही परम भक्ति । आपुली म्हणों ॥

–अ० १८ ओ० १२० ते २२

निष्काम कर्माचें आचरण करणाऱ्या कर्मयोग्याला हीच शेवटीं फलद्रूप होते. हिच्यामुळेंच सर्व विश्व परमात्म्यानें ओतप्रोत भरलें आहे असें ज्ञान होतें. त्या वेळीं वैराग्य विचारासह नष्ट होतें. बंध मोक्षासह गळून जातो. ब्रह्माकार वृत्तिहि शिल्लक उरत नाहीं. त्रिपुटीपलीकडील माझ्या शुद्ध स्वरूपांत मिळून तो माझें भजन करतो. द्वैत निखालस मावळून गेलें असूनहि त्याला माझ्या भक्तीचा उपभोग घेतां येतो. कोणत्याहि क्रियेवांचून त्याचें सहज भजन होतें. अद्वैताला कोणतीहि क्रिया सहन होत नाहीं हें खरें; तथापि अद्वैतांत भक्ति आहे व ती अनुभवानेंच जाणतां येते.

आरशानें आरशाला पाहिल्यास तें पहाणेंच न पहाणें होतें. सुवर्णानें सुवर्ण झांकल्यास तें झाकणेंच न झांकणें होतें. तद्वत् मद्रूप होऊन कर्म करणें तें न करणेंच होतें. कारण कर्म करीत असतां ' मी कर्ता ' असा अहंकार त्याला नसतो. त्याच्या सर्व क्रिया आत्मरूपच झालेल्या असतात.

क्रियाजात मी जालेपणें । घडे काहीचि न करणें ।
तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें ॥

म्हणौनि करी तयाही बोजा । तें न करणें हेंचि कपिध्वजा ।
निफजे तिया महापूजा । पूजी तो मातें ॥
ऐवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन ।
अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ॥
तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जप माझा ।
तो असे तेंचि कपिध्वजा ! । समाधि माझी ॥

जैसें कनकेंसी कांकणें । असिजे अनन्यपणें ।
तो भक्तियोगें येणें । मजसी तैसा ॥

—अ० १८ ओ० ११७८ ते ८२

असें आत्मस्वरूपीं ऐक्य पावून अद्वयभक्तीनेंच तो मला जाणतो. या बोधाला कारण जो परमात्मा तोहि मीच आहें असें तो समजतो. जागृति आल्यावर स्वप्नांतेल अनेकत्व संपून एकत्वच उरतें आणि तें ज्याचें त्यालाच समजतें. त्याप्रमाणें आपल्या अभेदपणाला जाणणारी ज्ञानकला ही आत्मरूप असून तो आत्मा मीच आहें हें तो अनुभवानें जाणतो."

## ५५ गीतेचें परम रहस्य

यानंतर भगवान् अर्जुनाला केलेल्या उपदेशाचा उपसंहार करीत आहे. गीतेंतल्या अनेक विषयांच्या रानांत सांपडून अर्जुनानें तात्पर्याला चुकूं नये, वृक्ष म्हणून फांदीला वळंघूं नये, फळ म्हणून देंठ तोंडांत घालूं नये यासाठीं त्याला गीतेचें परमरहस्य कथन करीत आहे.

" धुरंधर अर्जुना ! योगी पुरुष निष्काम कर्माचरणानें मी होऊन माझ्या रूपीं मिळतो. स्वकर्मांच्या टवटवीत फुलांनीं माझी पूजा केल्यामुळें माझ्या प्रसादानें त्याला ज्ञाननिष्ठा प्राप्त होते. त्याच ज्ञाननिष्ठेनें मग माझी परम भक्ति उल्हसित होते. आणि अखेरीस भक्तीनें माझ्याशीं समरस होऊन तो पूर्णपणें सुखी होतो.

यासाठीं अर्जुना, तूं माझ्या स्वरूपीं सर्व कर्मांचा संन्यास कर. म्हणजे भागा आलेलीं सर्व कर्मे करून त्या कर्मांचें फळ मला अर्पण कर. विचारपूर्वक हा फलत्याग होऊं दे. त्याच विचाराच्या बळानें कर्मावेगळें आपलें निर्मल स्वरूप तुला माझ्या स्वरूपांत दिसेल. मग त्याच आत्मस्वरूपांत तूं आपली बुद्धि स्थिर कर. अनन्यत्वानें बुद्धि जेव्हां माझ्यामध्यें प्रवेश करते तेव्हां चित्त अन्य विषयांचा त्याग करून माझेंच भजन करतें.

मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेधवां ।
माझा प्रसादु जाण तेधवां । संपूर्ण जाहला ॥
तेथ सकळ दुःखधामें । भुंजिजती जियें मृत्युजन्में ।
तियें दुर्गमेंचि सुगमें । होती तुज ॥
सूर्याचेनि सावायें । डोळा सावायिला[2] होये ।
तैं अंधाराचा आहे । पाडु तया ? ॥
तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु जयाचा उपमर्दे[3] ।
तो संसाराचेनि बाधे । बागुलें केवीं ? ॥
म्हणौनि धनंजया । तूं संसारदुर्गती यया ।
तरसील माझिया । प्रसादास्तव ॥

—अ० १८ ओं० १२६९ ते ७३

पार्था ! अहंकाराच्या बळानें माझा हा उपदेश कानामनावर न घेशील तर फसशील बरें ! त्यामुळें तुला जन्ममृत्यूंचे घाव सोसावे लागतील. पथ्य केलें नाहीं तर रोग वाढतो. दिव्याचा द्वेष करील त्याला अंधारांतच चांचपडावें लागतें. विवेकाच्या उपमर्दानें तसाच अहंकार बळावतो. याच अहंकाराच्या तावडींत सांपडून 'मी युद्ध करणार नाहीं' असा तूं निश्चय केला आहेस. पण तुझा नैसर्गिक स्वभाव हा निश्चय वाऱ्यावर उडवून लावील हें विसरूं नको. तुझी क्षात्र प्रकृति तुला लढायला भाग पाडील. शौर्य, तेज इत्यादि क्षात्र गुण हे तुझे उपजत गुण आहेत. ते ऐन वेळीं उचल खातील, यांत शंका नको. प्रकृति ही सर्वसमर्थ आहे. ती जीवाकडून कर्मे करून घ्यायला चुकत नाहीं. रोग कोणाला आवडतो का ? दारिद्र्य कोणाला हवेंसें वाटतें का ? पण जीवाचें प्रारब्ध ते ते भोग त्याला भोगवल्यावांचून राहत नाहीं. प्रारब्धाला ईश्वराची सत्ता आहे. आणि ईश्वर भूतमात्राच्या हृदयीं वास्तव्य करून राहिला आहे.

---

१. साह्यानें. २. मदत दिलेला. ३. नाहींसा होतो.

सर्वांच्या हृदयांत वास करणारा ईश्वरच सर्व भूतांचें अहंकाररूपी पांघरूण आपल्या अंगावर घेऊन प्रगटतो. तो स्वतः मायेच्या पडद्याआड राहून तिथून सूत्रें हालवतो आणि चौऱ्यायशीं लक्ष चित्रें नाचवतो. ब्रह्मदेवापासून कृमिकीटकापर्यंत भूतांना देहयंत्रावर आरूढ करून प्रारब्धानुरूप भ्रमवतो. लोहचुंबकाच्या सान्निध्यानें लोखंड जसें हालतें तशीं ईश्वरसत्तेनें भूतें रहाटतात. चंद्र उगवला कीं समुद्राला भरती येते, सोमकांत पाझरूं लागतो, कुमुदें उमलतात आणि चकोर आनंदित होतो. ईश्वर हा तसाच आपल्या मायेच्या योगानें भूतांना निरनिराळे व्यवहार करायला लावतो. प्राणिमात्राचीं सारीं कर्में प्रकृतीच्या अधीन आहेत आणि ती प्रकृति हृदयस्थ परमेश्वराच्या आधीन आहे.

तया अहं वाचा चित्त अंग । देऊनियां शरण रिग ।
महोदधी कां गांगे[1] । रिगालें जैसें ॥
मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांति प्रेमदे[2] ।
कांतु होऊनियां स्वानंदें । स्वरूपींच रमसी ॥
संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथें विसंवे ।
अनुभूतीहि अनुभवे । अनुभवा जया ॥
तिये निजात्मपदींचा रावो । होऊनि ठाकसी अव्ययो ।
म्हणे लक्ष्मीनाहो[3] । पार्था तूं गा ॥

—अ० १८ ओ० १३१९ ते २२

अर्जुना ! आणखी एक वेळ अवधान देऊन मी निर्वाणीचें जें कांहीं सांगतों तें ऐक.

तरी बाह्य आणि अंतरा । आपुलिया सर्व व्यापारा ।
मज व्यापकातें वीरा । विषयो करीं ॥

१. गंगेचें पाणी. २. शांतिरूप स्त्रीचा. ३. लक्ष्मीचा नाथ.

आघवां अंगीं जैसा। वायु मिळोनि आहे आकाशा।
तूं सर्व कर्मी तैसा। मजसींचि अस॥
किंबहुना आपुलें मन। करीं माझें एकायतन।
माझेनि श्रवणें कान। भरूनि घालीं॥

—अ० १८ ओ० १३५३ ते ५५

संत हे माझींच रूपें आहेत. त्यांचें आवडीनें दर्शन घे. तुझी वाणी माझ्या नामजपाच्या कार्यी लाव. सर्वत्र मला नमस्कार कर. विश्वीं विश्वंभराची मनोभावें सेवा कर. असें केल्यानें तुला माझा आश्रय मिळेल. मग या दृश्य जगताचा निरास होऊन मी देव आणि तूं भक्त असे दोघेच राहूं आणि हवा तेव्हां परस्पर सुखाचा सोहळा उपभोगूं. आम्हां दोघांमध्यें तिसरा असलेला जगद्भाव नष्ट झाला म्हणजे तूं माझा होऊन मलाच मिळशील. पाणी आटलें कीं त्याच्यांतलें प्रतिबिंब मूळ बिंबाला येऊन मिळतें. वारा आकाशाला किंवा लाटा सागराला मिळायला कोणाची आडकाठी असूं शकेल! तसाच देहभेदानें तूं आणि मी असा जो भिन्नभाव दिसतो तो नाहींसा झाला कीं आम्ही एकरूपच आहों.

आतां शेवटचें एकच सांगतों. आशेमुळें दुःख होतें. निंदा पापाला प्रसवते. दुर्दैव दारिद्र्य आणतें. तद्वत् स्वर्ग-नरकांना कारणीभूत होणारे धर्म-अधर्म हे अज्ञानांतून उगवतात. हें अज्ञान तूं समूळ उच्छेदून टाक. दोर हातांत घेतला कीं सर्पभ्रम दूर होतो. जागृति आली कीं स्वप्नांतलीं घरेंदारें मोडतात. आजार गेला कीं तोंडाची अरुचिहि जाते. तसें धर्माधर्म भासवणारें अज्ञान टाकून दिलेंस कीं धर्माधर्म दूर होऊन मी एकीएक तेवढाच शिल्लक उरेन. त्या मजशीं तूं सोहंबोधानें अनन्य हो!

पैं आपलेनि भेदेंविण। माझें जाणिजे जें एकपण।
तयाचि नांव शरण। मज येणें गा॥
जैसें घटाचेनि नाशें। गगनीं गगन प्रवेशे।
मज शरण येणें तैसें। ऐक्य करी॥

सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळु जैसा पाणिया ।
तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥

मजही शरण रिघिजे । आणि जीवत्वेंची असिजे ।
धिक् ! बोलीं इया न लजे । प्रज्ञा केवीं ॥

अगा ! प्राकृताही राया । अंगीं पडे जें धनंजया ।
तें दासिरूंही कीं तया । समान होय ॥

मा मी विश्वेश्वरु भेटे । आणि जीवग्रंथी न सुटे ।
हे बोल नको वोखटे । कानीं लावूं ॥

—अ० १८ ओ० १३९८ ते १४०४

अशा अद्वितीय बोधानें मला शरण आल्यावर तुला धर्माधर्माचें टवाळ बांधणार नाहीं. ताकांतून लोणी वेगळें काढल्यावर फिरून तें ताकांत मिसळत नाहीं. माझ्याशीं एकरूप झाल्यावर माझ्यावांचून दुसरें कांहीं उरतच नाहीं. म्हणून माझ्याशीं अनन्य झालास कीं पापपुण्याची विवंचना तुला करावी लागणार नाहीं. तुझें पापपुण्य मीच होईन. माझ्याहून वेगळेपणें उरणें हेंच पाप ! तें ज्ञानानें दग्ध होईल. मिठाचा कण सागरांत पडला कीं सागर त्याला आत्मरूप करून सोडतो. तसाच मीहि तुला मन्मय करीन. सर्व बंधनांतून तुला सोडवीन !! ”

एवढें बोलून श्रीहरीनें अर्जुनाला प्रेमभरानें दृढ आलिंगन दिलें.

मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।
आलिंगिला स्वशरणु । भक्तराज तो ॥

न पवतां जयातें । काखे सूनि बुद्धीतें ।
बोलणें मागौतें । वोसरलें ॥

१. बटीक.

ऐसें जें कांहीयेक । बोला बुद्धीसिही अटक ।
तें द्यावया मिखें[1] । खेंवाचें केलें ॥
हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें ।
द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ॥
दीपें दीपु लाविला । तैसा तो परिष्वंग[2] जाला ।
द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु ॥
तेव्हा सुखाचा मग तया । पूरु आला जो धनंजया ।
तेथ वाडु[3] तरी बुडोनियां । ठेला देवो ॥

—अ० १८ ओ० १४१८ ते २३

अर्जुन कृतार्थ झाला. पूर्णब्रह्म त्याच्या हृदयांत ओसंडूं लागलें. त्याला जिकडे तिकडे ज्ञानाचा लखख प्रकाश दिसला. त्याचा कंठ बाष्परुद्ध झाला. कांहीं बोलवेना आणि बोलावेंसें वाटेहिना. अर्जुन आतां अर्जुन उरला नाहीं हें सर्व-साक्षी भगवंतानें जाणलें. थोडा वेळ असा निःशब्द अवस्थेंत गेल्यावर देवानें त्याला देहभानावर आणलें.

" माझ्या लाडक्या भक्ता, माझ्या आत्मराजा, मीं केलेला उपदेश तूं एकाग्र-चित्तानें ऐकलासना? तुला तो पटलाना? तुजें अज्ञान मावळलेंना? मोह नष्ट झालाना?" भगवंताच्या या प्रश्नावर अर्जुन तृप्त झाल्याची पावती देत आहे :—

गुंतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त जालों तुझेपणें ।
आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाही ॥
मी तुझेनि प्रसादें । लाधलेनि आत्मबोधें ।
मोहाचे तया कांदे । नेदीच उरों ॥
जें मज तुम्हा आड । होतें भेदाचें कवाड ।
तें फेडौनि केलें गोड । सेवासुख ॥

१. निमित्त. २. आलिंगन. ३. मोठा.

तरी आतां तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा ।
करीन देईं अनुज्ञा । भलतियेविषयीं ॥

—अ० १८ ओ० १५६३ ते ७५

## ५६ पसायदान मागणें

याप्रमाणें संपूर्ण गीतेचें व्याख्यान संपल्यावर ज्ञानेश्वर म्हणतात—' गीता ही भगवंताची वाङ्मयमूर्ति आहे. तिचा अर्थ मीं मराठी भाषेच्या द्वारें विशद केला. माझ्यासारख्या प्राकृतानें गीतेवर टीका करणें हें खरोखर धाष्टर्य होय. माझ्या आवांक्याबाहेरची ती गोष्ट होती. पण मी व्यासांचा मागोवा घेत घेत आणि श्रीशंकराचार्यांना वाट विचारीत विचारीत गेलों आणि शेवटचा मुक्काम गांठला. मनांत धरलेला हेतु तडीला गेला. मनोरथ परिपूर्ण झाले. हा माझ्या सद्गुरुनाथांचा अनुग्रह. तेच माझ्या अंतरांत शिरून राहिले. अमृताहून सुरस असें कवित्व या ग्रंथांत प्रगटलें तें माझ्या सद्गुरूंच्या प्रसादानेंच ! या ग्रंथाच्या रूपानें मी तुम्हां संतांच्या पायांजवळ आलों. आतां मला काय कमी आहे ? सद्गुरूंनीं मला तुमची भेट करून दिली. हा ग्रंथ शेवटास गेल्यानें माझ्या साऱ्या पूर्वजन्मांचें सुकृत फळाला आलें. आतां शेवटचें पसायदान, त्या विश्वरूप प्रभूजवळ आणि तुमच्याजवळ मागतों तें हें कीं—

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान[1] हें ॥
जे खळांची व्यंकटी[2] सांडो । तया सत्कर्मीं रति वाढो ।
भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचें ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥
वर्षत सकळ मंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी[3] ।
अनवरत भूमंडळीं । भेटो तयां भूतां ॥

१. प्रसादाचें दान. २. वांकडेपणा. ३. समुदाय.

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥
किंबहुना सर्व सुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥

—अ० १८ ओ० १७९३ ते ९९

## ५७ ज्ञानेश्वरी–रहस्य

असो. ज्ञानेश्वरीवर चार शब्द लिहायचे मनांत आणले होते ते लिहून संपले. लिहिणें संपलें, पण ज्ञानेश्वरी ग्रंथावरचें प्रेम सपलें नाहीं. तें अनेक पटींनीं वाढलें. आज सहाशें वर्षें चढत्या-वाढत्या प्रेमानें भक्त-भाविकांनीं, रसिकांनीं आणि विद्वानांनीं हृदयाशीं कवटाळून धरलेली ही ज्ञानेश्वरी ! काय आहे एवढें हिच्यांत ! माझ्या अल्पमतीला अनुसरून सांगतों. ज्ञानेश्वरी म्हणजे विशुद्ध प्रेम ! ज्ञानेश्वरी म्हणजे भगवंतावर, सद्‌गुरूवर, भूतमात्रावर प्रेम ! आणि प्रेम म्हणजेच भक्ति. 'सा त्वस्मिन्परमप्रेमरूपा' असेंच नारदमुनींनीं तिचें लक्षण सांगितलें आहे. पण ही भक्ति म्हणजे आंधळी भक्ति नव्हे. जाणून भक्ति. ज्ञानोत्तर भक्ति. ज्ञानेश्वरीचा कर्ता कोंवळा. शब्द कोंवळे. आणि अर्थहि कोंवळा. अशी ही सगळीच कोंवळीक भरून उरली आहे. ज्ञानेश्वरी म्हणजे प्रेमरसानें थबथबलेलें मधुर फळ आहे. जो मुखीं लावील त्याला तें तिथून काढावेंसें वाटणार नाहीं. विद्वत्व, कवित्व आणि भक्तत्व यांचा त्रिवेणीसंगम झालेलें ज्ञानेश्वरी हें प्रयागतीर्थ आहे ! त्यांत बुडावें आणि मुक्त व्हावें !

प्रत्येक मानवानें भागा आलेलीं कर्में तत्परतेनें करावीं. कर्तेपणाचा अभिमान ठेवूं नये. कर्मफल ईश्वरार्पण करावें. ज्ञान मिळवावें. ज्ञानानें परमात्मा कसा आणि केवढा आहे तें ओळखून मग भक्तीनें त्याला दृढ मिठी मारावी, आणि सरतेशेवटीं 'अद्वैयानंदवैभव' लुटावें. हेंच ज्ञानेश्वरीचें रहस्य ! !

---

१. सूर्य.